# कांचनमेघ

[ निवडक भावगीतांचा संग्रह ]

गिरीश
सदस्य, रविकिरण मंडळ, पुणें

मूल्य ३ रुपये

आवृत्ति पहिली १९५५

व्हीनस प्रकाशन, पुणें २

चि रं जी व

**प्रा. मधुकर वासुदेव कुलेंकर,** एम्. एम्सी.

**व**

**सौ. मालती ( प्रभावती ) कुलेंकर**

**यांस**

# अनुक्रमणिका


| | |
|---|---|
| १ गाणाऱ्या मोहिनीस | १ |
| २ क्षण भेटलों | २ |
| ३ अनुक्त प्रीति | ३ |
| ४ हृदयदान | ४ |
| ५ बहाणा | ५ |
| ६ हृद्गत | ७ |
| ७ भेटीनंतर | ८ |
| ८ सरस्वती | ९ |
| ९ लाजविलेला गुलाब | १० |
| १० ध्यास | ११ |
| ११ तुझ्यावांचून | १२ |
| १२ भास | १३ |
| १३ मधुरमीलन | १४ |
| १४ तेढ | १५ |
| १५ विरहिणी | १७ |
| १६ तन्मयता | १९ |
| १७ पूजास्थान | २० |
| १८ गोड आठवण | २१ |
| १९ शूर्पणखा | २३ |
| २० गानमोहिता | २५ |
| २१ बकुळा | २८ |
| २२ जीवितेश्वरीस | ३१ |
| २३ आवाहन | ३२ |
| २४ चांदण्यातील भेट | ३४ |
| २५ मातृहृदय | ३६ |
| २६ गानचातुरी | ३९ |
| २७ आईचा आशीर्वाद | ४० |

२८ पितृस्मृति ४३
२९ विसरलेला नमस्कार ४४
३० आत्मनिवेदन ४५
३१ वियोगिनीचें पुण्यस्मरण ४६
३२ वाऱ्यामागं ! ४८
३३ सुखी संसार ५१
३४ परित्यक्ता ५३
३५ टाकलेली ५५
३६ पाय घसरला तर ५७
३७ दोन पातकी ६४
३८ भ्रियाणा ६६
३९ यशस्वी कोण ६९
४० स्थानभ्रष्ट फुलांस ७०
४१ कृतज्ञता ७१
४२ देवि क्षमे ! ७३
४३ सुंदर हिरवे माळ ७४
४४ वारेपाऊस ७६
४५ भलंरी ७९
४६ दौल्याची दिवाळी ८१
४७ धुक्यांत ८३
४८ शांतिस्थान ८४
४९ स्मृतिस्थळ ८७
५० आकाशलिंब ८९
५१ मानसमेघ ९०
५२ क्षणाचाच विलंब ९३
५३ श्रीशारदावंदन ९४
५४ कवितेचा जन्म ९५
५५ सुनीत ९६
५६ लक्ष्मीपूजनाच्या सायंकाळीं ९७

| | | |
|---|---|---|
| ५७ | सारंगीवाला | ९८ |
| ५८ | सूरसंगिनी | १०० |
| ५९ | सप्तर्षि | १०२ |
| ६० | गुरुदेव रवींद्र | १०३ |
| ६१ | गोपाळ कृष्ण गोखले | १०५ |
| ६२ | शनवारवाडा | १०६ |
| ६३ | निजलेल्या वसंतास | १०८ |
| ६४ | निशाणरोवणी | ११० |
| ६५ | मावळ्यांचें गाणें | १११ |
| ६६ | माळावरील शिरीष | ११३ |
| ६७ | निवांत | ११७ |
| ६८ | दीपिका | ११८ |
| ६९ | मनीषा | १२० |
| ७० | मुरली | १२२ |
| ७१ | मूक संगीत | १२३ |
| ७२ | संसारवन | १२४ |
| ७३ | काढणी | १२५ |
| ७४ | सहकार | १२६ |
| ७५ | पाठीराखा | १२७ |
| ७६ | ध्यान | १२८ |
| ७७ | याचना | १२९ |
| ७८ | आभार | १३१ |
| ७९ | रसग्रहण | १३३–१६४ |

# मुद्रणशुद्धि

| पान | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १ | ५ | गंडे | गडे |
| १३ | १२ | अणूंतून | अणूंतुन |
| १७ | ७ | किती | किति |
| १७ | १४ | अजूनि | अजुनि |
| २० | ४ | दड | दंड |
| ३७ | १ | भावताले | भोवताले |
| ३९ | ९ | खळबळ | खळखळ |
| ४३ | १२ | सून्य | शून्य |
| ४६ | १ | वियोगीनींचें | वियोगिनीचें |
| ४६ | ३ | सदज | सदन |
| ५० | १ | आाणीतातीं | आणीतातीं |
| ५४ | १० | हर्षन | हर्ष न |
| ५८ | ५ | तौल | तोल |
| ८२ | ९ | तो | तों |
| ९१ | ११ | बोधिसत्वा | बोधिसत्वा |
| ९४ | ५ | त्पर्शने | स्पर्शनें |
| ९४ | ११ | ध्यानस्त | ध्यानस्थ |
| १२० | ८ | आकाशाच्या | आकाशींच्या |
| १५३ | २ | सुनीनाला | सुनीताला |
| १५७ | १० | पंचाग्निसाधन | पचाग्निसाधन |
| १६० | १९ | ᴗ ᴗ | ᴗ — ᴗ |

याखेरीज नाही, ने, की, मधे, केव्हा, नी, कधी, तू, तिथे, इथे, वारे-पाऊस यांवर पडलेले अनुस्वार 'म. सा. प.'च्या नियमाप्रमाणें नको आहेत.

# माझें वाङ्मयीन जीवन

मी माझी खरीखुरी पहिली कविता इ. स. १९११ सालच्या डिसेंबर महिन्यांत म्हणजे माझी मॅट्रिकची परीक्षा संपल्यावर लिहिली, व ती कै. हरिभाऊ आपटे यांनीं आपल्या ‘ करमणूक ’ साप्ताहिकांत ‘ दिल्ली दरबार ’ खास अंकांत प्रसिद्ध केली. त्यामुळें मला काव्यलेखनास अप्रत्यक्षपणें प्रोत्साहन मिळालें. मॅट्रिकची परीक्षा संपल्यावर मी माझ्या आजोळीं म्हणजे उत्तर सातारा जिल्ह्यांतील ‘ फत्यापूर ’ गांवीं सहज विश्रांतीसाठी गेलों होतों. तेथील अंबेओळींतून मैल दीड मैल पूर्वेस गेलें, की लगेच कृष्णानदी लागते. या नदीकांठांकडे मी नित्य फिरावयास जात असे. एके दिवशीं सायंकाळीं मी असाच सहज फिरावयास गेलों होतों. या वेळीं नदीच्या परिसरांत रमणीय शोभा पसरली होती ! मावळत्या सूर्याचे किरण पाण्याच्या खळखळाटावरून, प्रशांत वाळवंटावरून, डगरीडगरींवरून व त्यांवरील झाडांवरून खेळत, फिके होत चालले होते ! ती शोभा पाहण्यासाठी मी नदीकांठच्या खडकावरील एका उंच डिंब्यावर बसलों होतों. माझें मन त्या सोनेरी सौंदर्यांत व नदीच्या मंजुळ खळखळाटांत रमून गेले होतें ! तोंच माझ्या भावना एकाएकी महिरून आल्या ! माझ्या अंतःकरणांत आनंदाच्या ऊर्मी दाटून आल्या ! मला काहीतरी लिहावें असें वाटलें व मी तिथेंच ’ नदीतटाकचा सायंकाळचा देखावा ! ’ ही कविता लिहून काढली. हीच माझी पहिली कविता ! तसें पाहिलें तर ही कविता सामान्य होती; पण तिच्या मागचा अनुभव व आनंद अपूर्व होता ! तो एक नवीन अनुभव होता ! आणि या कवितेला ‘ दिल्ली दरबार ’ खास अंकांत त्या वेळचे श्रेष्ठ कवि चंद्रशेखर यांच्या ‘ हिंदवंदना ’ या नितांतरम्य कवितेशेजारीं प्रसिद्धी मिळाली, त्यामुळें तर माझा आनंद शतगुणित झाला !

या आधीं मी कविता लिहण्याचे प्रयत्न केले नव्हते असें नाही.

इंग्रजी चवथी–पांचवींत असतांना कांहीं लिहिल्याचें स्मरतें; पण त्यांपैकीं आज जवळ काहीच नाही. त्यामुळें हीच माझी खरीखुरी पहिली कविता. तिच्या त्वरित प्रसिद्धीने व तिच्या जन्मकाळच्या आनंदाच्या एका नवीन अनुभवामुळें माझें मन कवितेकडे वळलें, म्हणूनच तिचें महत्त्व. ही कविता मी "**एक रहिमतपूरवासीय**" या टोपणनांवानें प्रसिद्ध केली होती. कारण एक तर माझी मलाच भीति वाटत होती; व दुसरें म्हणजे माझ्या कानावरून त्यावेळीं '**केशवसुत,**' '**गोविंदाग्रज,**' '**बालकवि,**' '**बी**' यांसारखीं अनेक टोपण नावें गेलीं होतीं. त्यामुळें टोपणनांवाने कविता प्रसिद्ध करणें मला सोयीचें व सुरक्षितपणाचें वाटलें. प्रथम प्रथम मी एक दोन वर्षें निरनिराळ्या नांवांनी कविता प्रसिद्ध केल्या; पण शेवटीं १९१३ सालीं मी माझ्या नांवाशीं सुसंगत असलेलें '**गिरीश**' हें टोपण नांव कायम केलें व तेव्हापासून आतापर्यंत मी त्याच नांवानें लिहित आलों.

१९११ ते १९२० या दशकांत मी अनेक कविता लिहिल्या व त्यांपैकीं काही "चित्रमयजगत्, काव्यरत्नावली, करमणूक, उद्यान, मनोरंजन" या नियतकालिकांतून यथाकाल प्रसिद्धहि केल्या. परंतु त्या मीं पुस्तकरूपाने कधीहि संग्रहित केल्या नाहीत. कारण त्यांपैकी काही तर अनुकरणात्मकच होत्या; व दुसरें म्हणजे तो माझ्या मनाच्या घडणीचा काळ होता. माझें मन कोणत्याहि एका निश्चित तत्त्वज्ञानावर स्थिर झालें नव्हतें. मला झालेलें जीवनदर्शन फारच अपुरें होतें. शिवाय मला ओळीने सरळ असें विद्यापीठाचें शिक्षण कधीच घेतां आलें नाही; माझ्यामध्ये अनेक उणीवा होत्या. त्यांत माझ्या वडिलांच्यावर काही तोहमत आल्यामुळे तिच्या निवारणार्थ मला पांच वर्षें परिस्थितीशीं रात्रंदिवस झगडावें लागलें; हें करीत असतांना सर्व कुटुंबाचा भार मला माझ्या दुबळ्या खांद्यावर घ्यावा लागला; त्याखाली पिचत असतांना आणखी कांहीं कौटुंबिक आपत्ति कोसळल्या व त्याखाली माझ्या मनाचा, आशांचा व महत्त्वकांक्षांचा चक्काचूर झाला! तरी पण तोहि एक जीवनांतला अनुभवच होता. माझा मनःपिंड जात्याच कणखर व आशावादी होता व त्याचेंच मला यांतून तगण्यास साहाय्य

झालें; म्हणूनच हा माझ्या घडणीचा म्हणजे जीवनांतील अनुभूति घेण्याचा काळ होता असें मी म्हटलें. वास्तविक अनुभूति ही आपण जन्मभरच घेत असतों; परंतु कच्च्या पूर्ववयांतील अनुभूति व नंतरच्या अनुभूति यांत संस्काराच्या दृष्टीने फरक पडतोच. त्याच फरकाचें प्रतिबिंब माझ्या पहिल्या वहिल्या कवितांत असल्याने त्यांना मी ग्रंथनिविष्ट केलें नाही.

या काळांत अधूनमधून मी विद्यापीठाच्या परीक्षा देई, पुणें न्यू इंग्लिश स्कूलमध्यें शिक्षकाची नोकरी करी, शिकवण्या करी व फावल्या वेळांत इंग्रजी, संस्कृत व मराठी भाषांतील नव्या जुन्या वाङ्मयाचें वाचन करी. या काळांत मी काही इंग्रजी, व संस्कृत कविताहि लिहिल्या होत्या. परंतु त्या चांगल्या न वाटल्यामुळें मीं फाडून टाकल्या व केवळ मराठी कवितेचाच व्यासंग आवड व हौस म्हणून चालू ठेवला.

या माझ्या घडणीच्या काळांत मला अगदी योगायोगाने पुण्यांतील व पुण्याबाहेरील काही तत्कालीन थोर कवींचा व लेखकांचा परिचय घडला. थोरांच्या परिचयाने व सहवासाने आपल्या मनाला मार्गदर्शन होतें, या भावनेनेच मी या गोष्टींकडे पहात होतों. या वेळीं माझ्याच वर्गांतील माझे एक मित्र व सातारचे कै. कवि इंदुकांत यांचे बंधू श्री. भास्कर नानाजी शिंदे ऊर्फ अरविंद हे माझे सहाध्यायी होते. आम्ही दोघांनी त्या वेळचे श्रेष्ठ व नामवंत कवि श्री. गोविंदाग्रज व बालकवि ठोंबरे यांजकडे जावयाचें ठरविलें. श्री. गोविंदाग्रजांनी पहिल्या भेटींतच ( दि. ३१-७-१४) आमचें स्वागत फार आपुलकीनें केलें व प्रचलित काव्यासंबंधी आपलें थोडेसे विचार आम्हांस ऐकविले. दुसऱ्या भेटीच्या वेळीं ( दि. ७-८-१४ ) शेजारींच बसलेल्या श्री. बालकवि ठोंबरे यांचा त्यांनीं आम्हांस परिचय करून दिला. यानंतर श्री. गोविंदाग्रजाकडे आम्ही फार तर चार दोन वेळच गेलेले असूं; पण श्री. बालकवींकडे मात्र मी नेहमी जात असे. तेहि माझ्याकडे एक दोन वेळ आले होते. या अवधींत श्री. गोविंदाग्रज व बालकवि याच्या काही कविता त्यांच्या तोंडून मला ऐकावयास मिळाल्या; हें माझें फार मोठें भाग्य होतें! 'नाचत ना गगनांत नाथा!'। ताऱ्यांची

बरसात।' ही कविता श्री. गोविंदाग्रजांनीं पुण्यांतील किर्लोस्कर थिएटर-मधील बाजूच्या विंगमधील एका खोलींत मला ऐकविलेली चांगली स्मरते; तसेंच श्री. बालकवींच्या घरीं गेलों असतां, त्यांनीं माझ्या आग्रहावरून मला 'फुलराणी' व 'यमदूत' या कविता ऐकविल्या. त्यांचे—

"छानी माझी सोनुकली ती। कुणाकडे ग पाहत होती?"

किंवा

"बोलवितात। विकाळ यमाचे दूत!"

हे शब्द अजून माझ्या कानांत घुमत आहेत! या काळांतील माझ्या कवितेवर या दोन्हींहि कवींची छाप पडली होती. म्हणूनच त्या कवितांना मीं अनुकरणात्मक असें संबोधलें. माझ्या 'कांचनगंगा' पुस्तकांतील—

'चला चला ग पाण्याला। गात गात मधु गाण्याला,
जलकुंभ करीं घेवोनी। चला गडे, झणिं कुंजवनीं'

या 'वनदेवींचें गाणें' या कवितेंतील ओळी म्हणजे त्याचें प्रत्यंतरच आहे. श्री. बालकवींच्या कवितेचें मला विशेष आकर्षण होतें. त्यांचा सहवासहि काही काळ झाला, त्यामुळे हें अनुकरण काही काळ अपरिहार्यच ठरलें!

याच काळांत कविवर्य श्री. ए. पां. रेंदाळकर हे 'मनोरंजन' ची नोकरी सुटल्यावर पुण्यांत श्री. हरिभाऊ आपटे यांच्या 'करमणूक' पत्राचे सहकारी संपादक म्हणून आले. त्यांचा माझा परिचय होऊन तो पुढे अखेरपर्यंत वाढत गेला. त्यांच्या प्रेरणेने मी करमणूकमध्यें गद्य व पद्य आणि क्वचित् निर्मयक कविताहि लिहूं लागलों. 'उद्यान'चे संपादक कै. श्री. गणपतराव कुलकर्णी हे मुंबईहून पुण्यास येत. त्यांचा माझा स्नेह जमल्यानें त्यांच्या 'उद्यान' मधेहि मी लिहित असे.

याच सुमारास (१९१६) माझे श्वशुर व श्री. तात्यासाहेब केळकर यांचे मिरज येथील शालेय गुरु रा. सा. गो. वि. श्रीखंडे यांनी श्री. तात्यासाहेब केळकर यांची माझी माझी ओळख करून दिली. आणि याच अनुषंगाने माझा श्री. श्री. कृ. कोल्हटकर, प्रो. वा. म. जोशी, फडके, खांडेकर आदि थोर सात्यिकांशीं परिचय झाला.

याच वेळीं आणखी एक महत्त्वाची व जिव्हाळ्याची अशी ओळख पुण्यांत झाली. ती म्हणजे कविवर्य 'अनंततनय' ऊर्फ दत्तात्रय अनंत आपटे यांची होय. श्री. अनंततनय यांना आम्ही वडिलकीच्या नात्याने 'भाऊ' असें म्हणत होतों. श्री. भाऊंचें घर म्हणजे पुण्यांतील व पुण्याबाहेरील कवींच्या व साहित्यिकांच्या हमखास भेटीगांठी होण्याचें एक हुकमी संकेतस्थल होतें. मी व अरविंद तेथें नेहमीं जात असूं. श्री. भाऊंचें आम्हां दोघांवर अपत्यनिर्विशेष प्रेम असे. त्यांच्या घराला पुण्यातील एक साहित्यिक विनोदानें 'आदिपीठ' असें म्हणत असत. श्री. भाऊंनी आपल्या अनेक कविता आम्हांला आपल्या घरीं ऐकविल्या. त्याचे 'हृदयतरंगाचे' सर्व भाग, 'विनायकाच्या कवितेचें संपादन,' 'अंतर्विद्धकलिका' हें काव्य, 'गीतेचें भाषांतर' किंवा 'तिलकविजय' हें महाकाव्य, हीं पुस्तकें तयार होत असतांना मी पहात होतों. आम्ही काव्यविषयक अनेक गोष्टींवर चर्चा केल्या. या सर्वांचे संस्कार माझ्या मनावर झाल्याखेरीज राहिले नाहीत. प्रो. श्री. बा. रानडे, सौ. मनोरमाबाई रानडे, माधवराव पटवर्धन, प्र. के. अत्रे, मा. गो. भिडे, ना. म. भिडे, श्री. नी. चाफेकर, श्री. विठ्ठलराव घाटे वगैरे अनेकांच्या ओळखी श्री. भाऊंच्या घरीं झाल्या. मला श्री. भाऊंच्या कवितापेक्षा त्यांच्या व्यक्तिमत्वाचें आकर्षण विशेष असे. कारण त्यांच्या कविता सर्वस्त्री जुन्या वळणाच्या असत. आधीच माझें मन बालकवींच्या कवितेने भारलेलें व त्यांत प्रो. श्री. बा. रानडे, माधवराव पटवर्धन यांच्यासारख्या पुरोगामी कवींची मैत्री झालेली. त्यामुळें काव्यक्षेत्रांतील जें जें नवीन व पुरोगामी त्याकडे माझें मन धावूं लागलें. एका दृष्टीने काव्यक्षेत्रांतील ही माझी प्रयोगशील विद्यार्थिदशाच होती. माझ्या कवितेलाहि स्थिर असें स्वरूप अजून प्राप्त झालें नव्हतें. ती गोष्ट लवकरच एका निराळ्या घटनेने घडून आली.

१९२०–२२ मध्यें मी पुणें येथील फर्ग्युसन कॉलेजमध्यें बी. ए. च्या वर्गांत शिकत होतों. माझे विषय इंग्लिश ऑनर्स व संस्कृत हे असल्याने माझा विशेष संबंध गुरु. प्रि. वा. ब. पटवर्धन व डॉ. पां. दा. गुणे यांच्याशीं येत

असे. पुढे मी संस्कृत सोडलें व विद्यापीठांत नवीनच आलेला ‘ मराठी ’ हा विषय घेतला. त्यामुळें गुरु. प्रि. पटवर्धन यांच्यांशींच माझा विशेष संबंध येऊं लागला. आता त्यांचा उत्तम परिचयहि झाला होता. त्यांच्या घरीं जावें, नाट्यछटाकार ‘ दिवाकर ’ यांच्याशीं ते चर्चा करीत असतांनाची त्यांची विविध विषयावरील प्रवचनें ऐकावीं, वर्गांतील व वर्गाबाहेरील त्यांच्या रसाळ व जोमाने रसरसलेल्या व्याख्यानांचें आतुरतेने पान करावें, असे कार्यक्रम नित्य चालत. याचा परिणाम माझ्या मनावर फार झाला. गुरु. प्रि. पटवर्धन हे आम्हां विद्यार्थ्यांचे खऱ्या अर्थाने ध्येयदर्शी मार्गदर्शक होते. त्यांच्या शिकवणीने अनेकांना प्रेरणा मिळाली. मला त्यांच्यापासून अतोनात फायदा झाला. या वेळीं ( १९२० ) मी आपलें ‘ **अभागी कमल** ! ’ हें खंडकाव्य लिहित होतों. त्यांतील कांहीं भाग घेऊन, भीत भीत मी एक दिवस त्यांच्याकडे गेलों, व त्यांना ते वाचून दाखविले. गुरु. प्रि. पटवर्धन हे कवितेची चिरफाड करण्याबद्दल प्रसिद्ध होते. पण त्या दिवशीं, काय झालें कोणास ठाऊक, त्यांची ती वृत्ति उसळून आलेली दिसली नाही. उलट मी वाचून दाखविलेलें मनःपूर्वक ऐकून ते हसले व “ आम्हांला असलें काव्य आवडतें ! ” असा त्यांनी एकदम अभिप्राय दिला; आणि पुन्हा एकदा ते मनापासून खदखदून हसले ! मला त्यांचें तें हसणें चांदण्यासारखें शीतळ व प्रेरक वाटलें ! त्यांचे शब्द शिरोधार्य मानून मी घरीं आलों व तें काव्य पुरें केलें.

१९२० मध्यें लोकमान्य टिळक वारले ! पुण्यामध्ये गेलीं सहा वर्षे त्यांचें नित्यदर्शन व व्याख्यान यांचा लाभ आम्ही घेत होतों. आमच्या मनावर त्याचे फार दृढ संस्कार झाले होते. लोकमान्यांच्या निधनावर मी दोन कवितांची एक वैलापिक पुस्तिकाहि काढली होती. त्यावेळीं त्यांच्यावर उत्तमोत्तम कविता लिहणारे म्हणजे श्री. प्र. के. अत्रे ( ‘ अकरावा अवतार ’ ), शं. शा. काळे ( ‘ अस्तोदय ’ ) व ‘तारकानाथ’ (‘तुटलेला तारा’) असे तीन कवि विशेष गाजले होते. श्री. ‘ तारकानाथ ’ कवि म्हणजे आजचे ‘ राज-कवि **यशवंत** ’ हे होत. या निमित्ताने त्यांचा माझा परिचय झाला व

परस्पर जाणें येणें सुरू झालें. त्या परिचयाचें मैत्रींत रूपांतर होऊन आम्ही आजन्म एकमेकांचे मित्र झालों.आमचें '**वीणाझंकार**' त्याचेंच द्योतक आहे.

१९११ ते १९२० या काळामधें मला मराठी साहित्यांतील काव्य, नाटक व कादंबरी यांच्या विकासाचा वैभवशाली काळ व ते ते लेखक प्रत्यक्ष पहावयास मिळाले. पुढे १९२० चे आगेमागे अनेक नामवंत कवि, नाटककार, साहित्यिक दिवंगत झाल्यामुळें तिथे पूर्वीच्या पिढीचा कालखंड संपला असें सर्वांना त्यावेळीं वाटलें व इतिहासकारांनीहि पुढे तसेंच नमूद केलें. या सुमारास अनंततनयांच्या घरीं अतिशय आपुलकीने एकत्र येणाऱ्या आम्हीं चौघां मित्रांनी म्हणजे प्र. के. अत्रे, अज्ञातवासी, अरविंद व मी, यांनीं श्री. भाऊंच्या मदतीने पुण्यांत '**श्री महाराष्ट्रशारदामंदिर**' ही संस्था स्थापन केली. मंदिराच्या साप्ताहिक बैठकींत चर्चा, निबंधवाचन, काव्यगायन, काव्यवाचन वगैरे अनेक कार्यक्रम होत असत. यांमध्यें स्थानिक व परस्थ सदस्य साहित्यिक मोठ्या आस्थेने भाग घेत असत. श्री. भाऊ ऊर्फ अनंततनय हे या मंदिराचे अध्यक्ष होते व प्रा. श्री. नी. चोपकर हे उपाध्यक्ष होते. परंतु मंदिराच्या प्रेरणांचें सर्व वळण जुनें असे. जुनी वृत्तें, जुन्या कल्पना, जुने आशय, जुन्या पद्धति यांचाच विशेष पुरस्कार होतांना दिसे. मंदिराच्या श्रोतृवर्गांत श्री. माधवराव भिडे, ना. म. भिडे, दिवाकर, प्र. के. अत्रे, अरविंद, माधवराव पटवर्धन, श्री. बा. रानडे, द. ल. गोखले. यशवंतराव पेंढरकर, सौ. मनोरबाई रानडे, ग. त्र्यं. माडखोडकर, अज्ञातवासी आदि अनेक जुने नवे साहित्यिक उपस्थित असत. परंतु मंदिराच्या जुन्या वळणाच्या धोरणामुळें आम्हां काही मित्रांची कुचंबणा होऊं लागली. म्हणून प्रा. श्री. बा. रानडे यांच्या प्रेरणेने आम्ही सात आठ मित्र मंदिराचे सदस्य राहूनहि इतर वेळीं स्वतंत्रपणें एकत्र येऊन काव्यक्षेत्रांतील पुरोगामी दृष्टीवर चर्चा करूं लागलों. यांतूनच १९२३ सालीं '**रविकिरणमंडळ**' जन्माला आलें. अर्थात् मंदिराचें कार्य आम्ही अंगाबाहेर कधीच टाकलें नाही. पण जें तेथे होणें शक्य नव्हतें, अशा गोष्टींवर, कल्पनांवर व ध्येयावर लक्ष देऊन, आम्ही 'रविकिरणमंडळाच्या'

आठ लोकांनी आपली दिशा व धोरण आंखलें. 'रविकिरणमंडळ' हें निकट स्नेहभावाने जवळ आलेलें एक वाङ्मयीन कुटुंब होतें. श्री. विठ्ठलराव घाटे म्हणतात "रविकिरणमंडळ हा एक छोटासा सामाजिक व सांस्कृतिक प्रयोग होता." (पहा—स्वागताध्यक्ष वि. द. घाटे यांचें १५ मे १९४९ मधील पुणें कवि-संमेलनांतील भाषण) 'सहकारी पतपेढी' म्हणून त्याची श्री. अत्रे यांनी कितीहि चेष्टा केली, तरी मंडळाने केलेली मराठी साहित्याची सेवा, मंडळाने एकमेकाशीं आजपावेतों अखंड बत्तीस वर्षे ठेवलेलें स्नेहभावाचें नातें व त्याच प्रेरणेने कै. माधवराव पटवर्धन यांचें पुण्यांत 'म. सा. प.'मध्ये उभारलेलें '**माधवराव पटवर्धन साहित्यमंदिर**' हें भव्य स्मारक, हीं महाराष्ट्रांत तरी अनन्यसाधारण ठरलेलीं आहेत. मंडळाच्या साप्ताहिक किंवा नैमित्तिक बैठकींत पुरोगामी विचारांतील नवीन बीजें रुजवलीं जात, कलेवर चर्चा होई, सुनीत, गजल, भावगीत, नाट्यगीत यांच्या तंत्रावर विचार-विनिमय होई, छंदःशास्त्राची छाननी होई, सहलीच्या कल्पना निघत व साहित्याच्या सर्व अंगोपांगांचा विचार होई. या सर्वांचा एकच एक परिणाम म्हणजे सर्वांनाच सौंदर्यजीवी, पुरोमागी जीवनाची व साहित्याची ओढ लागे, व नैमित्तिक मूल्यापेक्षा शाश्वत, चिरंतन मूल्यांवर सर्वांची दृष्टी खिळून बसे. याला धरूनच रविकिरणमंडळाची आजवरची सर्व साहित्य-संपदा बाहेर आलेली आहे. मंडळाच्या ध्येयाचा आविष्कार त्याच्या पुस्तकांतून झालेला आहे, हें त्याच्या आस्थेवाईक वाचकांस कळेल.

'रविकिरणमंडळाची' घटना माझ्या वाङ्मयीन जीवनाला अतिशय उपकारक ठरली. मंडळांतील चर्चांनी व वादविवादांनी मनांतील जळमटें व कोळिष्टकें पार झाडून निघालीं, इतकेंच नव्हे तर त्यांनी माझ्या लिखाणास अंतर्बाह्य उजळा मिळाला, आमचीं ध्येयें स्पष्टतर झालीं, सहानुभूति व्यापक झाल्या; आणि याच आधाराने वाटचाल करून माझी कविता जीवनसौंदर्याचा वेध घेत पुढे मार्ग क्रमूं लागली.

लवकरच '**अभागी कमल**' हें खंडकाव्य मी पुरें केलें व तें लगेंच (१९२३) मुंबईच्या 'मनोरंजन' मासिकांतून पाकळीशः प्रसिद्ध झालें. या

कामीं मनोरंजनाचे उपसंपादक श्री. विठ्ठल जिवाजी नाडकर्णी यांची सहानुभूति मला अत्यंत मार्गदर्शक झाली. माझ्या वाङ्मयीन जीवनांत मला माझ्या वडिल पिढींतील अनेक थोर साहित्यिकांनी आपल्या अंतःकरणांतील ओलावा वेळोवेळीं मोठ्या आस्थेने दिला. मला वाटतें त्या पिढीचा हा एक उल्लेखनीय ठळक मनोधर्मच होता.' त्यामुळें नवीन लेखकास त्यांचें बोट धरून निःसंकोचपणें पुढे येण्यास वाव मिळे. 'मनोरंजन' च्या असंख्य वाचकांनी मला माझ्या 'अभागी कमल' बद्दल गौरवपर पत्रें लिहिलीं, कित्येकांनीं त्यावर कविता लिहून अभिनंदन केलें व काही भगिनींनीं त्याचें मनोभावें परीक्षण करून मला आपली सहानुभूति जाणवली. या सर्वांचें प्रोत्साहन प्रेरक ठरलें. पुढे मी '**कला**', '**आंबराई**' '**अनिकेत**' हीं खंडकाव्यें व अनेक स्फुट कवितांचे संग्रह प्रसिद्ध केले.

गुरु. प्रि. वा. ब. पटवर्धन आम्हांला बी. ए. च्या वर्गात, वर्डस्वर्थने आपल्या एका काव्यसंग्रहाला जोडलेली प्रस्तावना शिकवित होते. 'काव्याची भाषा ही आपल्या रोजच्या भाषेसारखी असली पाहिजे' या त्याच्या विधाना-वर ते खूप चर्चा करीत. या विधानांतील त्याच्या गुणदोषांवर विस्तृत चर्चा झाल्याने, मला काव्याच्या भाषेची पूर्ण कल्पना आली व 'अभागी कमल' या काव्याच्या लेखनाच्या वेळीं मला तिचा फार उपयोग झाला. मला माझी भाषा सांपडली असें वाटलें व तिचाच मी पुढे अवलंब केला.

१९२० सालीं लोकमान्य टिळकांच्या निधनाबद्दल पुणें येथील फर्ग्युसन कॉलेजमध्यें के. तात्यासाहेब केळकर यांच्या अध्यक्षतेखाली अँफी-थिएटरमध्यें विद्यार्थी, प्राध्यापक व नागरिक यांची एक प्रचंड दुखवट्याची सभा भरली होती. त्यावेळीं लोकमान्यांवरील मी लिहिलेली एक वैलापिक कविता म्हणण्याचें काम मजकडे आलें होतें. माझें म्हणणें फारच परिणाम-कारक झालें, हें त्यानंतरच्या श्री. तात्यासाहेबांच्या प्रशंसापर शब्दांनी माझ्या ध्यानांत आलें. हेंच माझें सार्वजनिक असें पहिलें काव्यगायन ! या साधनाचा योग्य उपयोग केल्यास लोकांत कविताश्रवणाची गोडी निर्माण होईल असें मला वाटलें, आणि पुढें मी त्याचा अवलंब केला. मी जाहीर

काव्यवाचनांत माझ्या व इतर जुन्या नव्या कवींच्याहि कविता म्हणत असे. माझ्याप्रमाणेंच श्री. यशवंत, प्रा. मायदेव हेहि काव्यगायन करीत. त्यामुळें कवितेकडे पुष्कळांचें लक्ष वेधलें असा पुढे अनुभव येऊं लागला. १९२० ते १९३५ या दरम्यान नागपूर ते कराची व ग्वाल्हेर ते धारवाड या दरम्यानच्या प्रांतांत आमचीं शेकडों काव्यगायनें झालीं. आधुनिक मराठी कवितेला रसिकांनी अनेक प्रकारें गौरविलें आणि मराठी कवितेचा वाचक रसिक व चोखंदळ बनला. यांत थोडी आत्मप्रसिद्धी होती, पण तें ध्येय खास नव्हतें. वाचक किंवा श्रोते व कवि यांमध्यें पाहिजे असलेला प्रेरक सहानुभाव होता. त्यामुळेंच या दरम्यानच्या पिढीने खूप काव्य ऐकलें व काव्याला प्रेरणाहि दिली.

१९१२ ते १९३६ अखेरपर्यंतचें माझें कौटुंबिक जीवन फार खडतर गेलें. संसारांतील अनेक आपत्तींशीं मला २४ वर्षें सतत सारखें झुंजत रहावें लागलें. या वेळच्या माझ्या जीवनांत केवळ आर्थिक आपत्तीच नव्हत्या. त्यांत सर्व प्रकारच्या म्हणजे आधिदैविक व आधिभौतिक आपत्तीहि होत्या. मला आपलें अपुरें राहिलेलें शिक्षण पुरें करण्याची जबरदस्त पोटतिडीक होती; पण त्याबरोबरच माझ्या कुटुंबियांतील कुणालाहि मला मागें ठेवावयाचें नव्हतें. या दोन्हींचा तोल सावरणें मला फारच कठिण जाई. मग माझें मन व्यग्र व व्यथित होई आणि साहजिकपणें तें दिलाशासाठी कवितेकडे वळे. माझ्या 'झुकलेली नौका,' 'आत्मनिवेदन,' 'दोन देवी,' 'निशाणरोवणी' यासारख्या अनेक कवितांतून त्या त्या वेळच्या माझ्या भावनांचा उद्रेक झाला आहे. काव्याप्रमाणेंच संगीताचा मी पहिल्यापासून साक्षेपी अभ्यासक. संगीताने लहानपणापासून माझें मन अतिशय आकर्षिलें आहे व त्याच्या श्रवणाने मला अतिशय रिझविलेंहि आहे. संगीत हा माझ्या जीवनवीणेवरील प्राणसूर आहे. चित्रकलेनेंहि माझें मन असेंच एका काळीं आकर्षित केलें होतें. पण फाटक्या परिस्थितींत शेवटीं थोडेसें काव्यच माझ्या हातीं लागलें! इतरांचें केवळ आकर्षणच राहिलें. त्यामुळें संगीत, चित्र, शिल्प, नर्तन या कलांतून जेव्हां मला सौंदर्यदर्शन घडतें, त्यावेळीं

मला 'माझें असें काही तरी सापडलें' असें वाटतें. माझ्या कवितांत या कलांचे पडसाद कुठें दिसत असल्यास, त्याचें मूळ या अपुऱ्या राहिलेल्या असमाधानांत आहे, असें मला नम्रपणें म्हणावेसें वाटतें.

जीवनाविषयीं मला अतिशय जिव्हाळा आहे व स्वतःच्या जीवनाबद्दल तर तो अतिशय तीव्र आहे. पराभव मला सोसत नाही; पण पराभवाने माझ मन हताशहि होत नाहीं; उलट यशाच्या रोखाने तें दुप्पट वेगाने मार्ग क्रमूं लागतें हा माझा नित्याचा अनुभव आहे. या प्रवृत्तीमुळेंच मी जीवन यशस्वी करण्यासाठी दीर्घकाळ धडपडत राहिलों. याचें दुसरें कारण असें कीं, माझें बाळपण अतिशय वैभवांत गेलें व मी मॅट्रिक झालों त्या वेळीं माझ्या घराण्यावर अनेक आपत्ती कोसळल्या; त्या इतक्या, की रोजचें साधें लौकिक जीवनहि प्रतिष्ठेने जगणें अशक्य झालें! हें कोसळलेलें मंदिर पुन्हां उभारण्याची जबाबदारी मजवर, मी वडिल मुलगा म्हणून, येऊन पडली! विकट परिस्थितीतीने मला दिलेलें तें आव्हानच होतें! तिने माझा स्वाभिमान जागृत केला; माझ्या सर्व शक्ति आत्मभावाने जागृत झाल्या व यशासाठी धडपडूं लागल्या. माझे आई-वडिल व भावडें यांना पूर्वस्थितींत नाही, तरी निदान सुस्थितींत, स्वास्थ्यांत नेऊन ठेवावयाचें व माझ्या भावंडांना सुशिक्षित करावयाचें, हें अवघड काम करण्याचें मी ठरविलें. त्यामुळें मी जीवनाचा अभ्यासू बनलों. माझ्या संकटांनी मजवर उपकारच केला. त्यांनी मला जीवनाची दृष्टी दिली व माझ्या ध्येयाने मला झगडण्यास शिकविलें. मी एका अनुष्टुपांत म्हटल्याप्रमाणें.–

" उदयास्त नको देवा ! । देशीं की तरी दे जिणें,
असूनी अस्त आरंभीं । उदया मग पाहणें ! "

मी हा मंत्र म्हणत पुढे चाललों होतों. या प्रवासांत निंदा, अपमान, हेटाळणी, क्षुद्रता, अधिक्षेप याचे मर्मभेदी वार मला सोसावे लागले; पण हे जसे काही वाईट अनुभव आले, तसे काही चांगलेहि अनुभव आले. या सर्वांनी माझें भलेंच केलें. माझ्या पत्नीनें जीवनांत कमालीचा त्याग केला व

आपल्या अतीव सौजन्याने व शांतपणाने माझें विस्कटलेलें कौटुंबिक जीवन सावरण्यास मदत केली; माझे पुणें 'न्यू इंग्लिश स्कूल'मधील शिक्षणक्षेत्रांतील गुरु प्रो. वि. ब. नाईक यांनी मला कमालीचा धीर दिला, सक्रिय सहानुभूति दाखविली व शिक्षण क्षेत्रांत मला पुढे येण्यास मदत केली. माझ्या बंधूंनी मला त्यागपूर्वक मदत केली. याखेरीज माझे काही जिव्हाळ्याचे नातेवाईक, मित्र, विद्यार्थी-विद्यार्थिनी किंवा माझीं मुलें यांनी माझ्या भोवती आपला उत्कट स्नेहभाव उभा केला व आपली मायेची ऊब मला दिली. १९४० नंतरचें माझें जीवन अत्यंत सुखाचें, समाधानाचें व निरामय झालें, याला कारण या सर्वांची माया. माझ्या लौकिक घडणीचें श्रेय जसें माझ्या आप्तेष्टांना व गुरुमित्रांना आहे, तसें माझ्या आंतर घडणीचें श्रेय माझ्या साहित्यगुरूंना व माझ्या पत्नीला आहे. या सर्वांबद्दल वाटणारी कृतज्ञता मी माझ्या कवितांतून ठिकठिकाणीं पेरली आहे. 'आजचें आमचें समाधानाचें जीवन म्हणजे नियतीने आमच्या तपस्येला दिलेलें पारितोषिक आहे,' असें मी कधी कधी मौजेने म्हणतों. पण त्याच्या बुडाशीं या सर्वांबद्दलची कृतज्ञताच आहे.

१८८० पासून आधुनिक मराठी कविता ही निरनिराळ्या अवस्थांतून गेली आहे. तिच्या स्वरूपाचें विवेचन करण्याचें हें स्थळ नव्हे. परंतु १९०५ पर्यंतचा काळ सोडला तर तिचीं पुढील स्थित्यंतरें मी स्वतः डोळ्यांनीं पाहिलीं व कवितांमधून अनुभविलीं आहेत. त्यांचें अध्ययन करीत करीत व स्वतांस सुचलेल्या विषयावर चिंतन करीत, मी माझी कविता लिहिली आहे. तेव्हा वाचकांनी हीं स्थित्यंतरें, व माझ्या जीवनाची रूपरेखा आपल्या मनाच्या पार्श्वभूमींत ठेवल्यास, माझी कविता वाचतांना त्यांना अबोध होऊं नये असें वाटतें. '**कांचनमेघ**' या प्रस्तुत संग्रहांत मी '**कांचनगंगा, फलभार** व **मानसमेघ**' या संग्रहांतील निवडक कविता घेतल्या असून, '**चंद्रलेखा**' या संग्रहांतील 'माळावरील शिरीष' व 'निवांत' या कविता आणि '**दीपिका**' व '**मनीषा**' या अजिबात नवीन कविता समाविष्ट केल्या आहेत. माझ्या खंडकाव्यांतील यांत एकहि उतारा घेतलेला नाही. त्यामुळें हा काव्यसंग्रह

१९२० ते १९५३ या काळांतील माझ्या भावगीतांचाच प्रातिनिधिक आहे.

कवितांची विषयवार वर्गवारी करणें श्रेयस्कर व सोयीस्कर नसतें. कारण व्यक्ति तितक्या प्रकृति रसिकवर्गांतहि असतात. जी कविता आपण निसर्गाची म्हणून पुढे करतों, ती एखादा मार्मिक वाचक सामाजिक म्हणून समजण्याची शक्यता असते; व जी प्रीतिविषयक आहे अशी आपली भावना असते, ती एखाद्यास अध्यात्मिक वाटण्याचा संभव असतो. म्हणून अशी वर्गवारी करणें बरें नसतें. परंतु कविता एकापुढे एक ठेवतांना काही तरी एखादा स्थूल धागा अनस्यूत ठेवलाच पाहिजे. त्यामुळें वाचकालाहि काही एका धोरणाने वाचतां येईल. त्यांतूनहि त्याने एखादी कविता दुसऱ्याच विभागांत घातली तर त्याला तेवढी सवड ठेवलीच पाहिजे. आणि नाही तरी कवितांची अशी कांटेकोर विभागणी करतां येतच नाहीं. कविता जन्माला येते, त्यावेळींच ती आपला आशय, वृत्त व जातगोत घेऊन स्वयंस्फूर्तीने बाहेर पडते. तथापि '**कांचनमेघां**'तील विभागणीचें स्थूल स्वरूप काय आहे, त्याचें थोडें विवेचन करून हें निवेदन संपवितों.

या संग्रहांतील कवितांचे 'प्रीति, संसार, समाज, निसर्ग, कविता-व्यक्ति व स्थळें आणि अंतर्जीवन' असे स्थूल सात भाग पाडतां येतील.

प्रीतिविषयक कवितांत रेखाटलेल्या सर्वच अनुभूती माझ्या जीवनांतल्या आहेत, असें समजण्याचें कारण नाहीं. एखादी अनुभूति आपल्या जीवनांतून मिळते, तर एखादी आपण दुसऱ्याच्या जीवनांतून उचलतों. इतकेंच काय, पण कित्येक वेळां दुसऱ्याच्या जीवनांतून उचलेली अनुभूति, आपण आत्मपर म्हणून मांडतों, तर प्रत्यक्ष आपल्या जीवनांतील अनुभूति वस्तुनिष्ठतेने-नाटयगीताने आपण मांडतों. प्रश्न आहे तो अनुभूतीचा कण कोणाचा आहे हा नसून, तो आपण किती आत्मसात् केला आहे व किती तन्मयतेने व उत्कटतेने रेखाटला आहे, हा आहे. कवितेच्या कुळकथा किंवा रसिकांनी त्याचें केलेलें रसग्रहण यांत सर्व वेळीं मेळ पडेलच असें नाही. कवितेची आंतर भूमिका किंवा वृत्ति ( Mood ) काय आहे, हें जाणून रसिकाने

कविता वाचली कीं तिचें जीवित सुफलित झालें, असेंच समजावयास हवें. या दृष्टिकोनांतून प्रीतिविषयकच काय, पण सर्वच कवितांकडे पहावयास हवें.

या दृष्टीनें या संग्रहांतील १ ते २२ कविता वाचल्यास, त्यांत प्रीतीचीं विविध स्वरूपें दिसतील. या विभागांतलि भावगीतें, नाट्यगीतें, गज्जल, सुनीतें वा 'बकुळा' सारखें छोटेसें कथागीत हीं सर्वच सौंदर्यजीवी भावनेंतून उमळलेलीं आहेत. १९२० नंतर स्त्रीजीवनाकडे पहाण्याचा दृष्टिकोन बदलला होता. या दृष्टीला प्रीतिविवाहासारख्या ध्येयाचें दर्शन झालें होतें. पण तें प्रत्यक्ष जीवनांत हस्तगत झालें नव्हतें; प्रत्यक्ष जीवनांत तें आणण्याची धडपड चालू होती. या वेळेच्या आगेमागे निर्माण झालेल्या काव्यांत, नाटकांत वा कादंबरींत या धडपडीचींच प्रतिबिंबें पडलीं आहेत. प्रस्तुत विभागांत, 'आपल्या गायनांतून प्रीतीची मोहिनी घालणारें अंतःकरण आहे, क्षणाच्या दर्शनानें कायमचा चटका लावणारा भाव आहे, गाढी प्रीति अनुक्तच असते याचें प्रत्यंतर आहे, प्रीतीच्या समर्पणाची रीत आहे, भेटींतील गुप्त सरस्वती आहे, लाजविलेल्या गुलाबांत किंवा वरकरणी बहाण्यांत दडलेल्या प्रीतीच्या नर्मविनोदांचें दर्शन आहे, प्रियकराचा ध्यास आहे व भासहि आहे, विरहावस्थेंतील तळमळ, प्रेमकलहांतील तेढ, मधुर मीलनांतील किंवा मनोमय मीलनांतील तन्मयता आहे, प्रीतीच्या गुणांची पूजा आहे, संसारांत खरीखुरी मनःशांति देणाऱ्या जीवितेश्वरीचें दर्शन आहे व क्वचित् अनाठायीं प्रेम बसल्यावर मिळालेल्या शासनांतील कारुण्य वा हास्यास्पदताहि आहे.' यातील प्रसंग विविध असले, मनोवृत्ती वेगवेगळ्या असल्या, किंवा वृत्तीमागील व्यक्तीहि वेगवेगळ्या असल्या, तरी त्यांतून प्रीतीचा भाव व्यक्त करण्याचा प्रयत्न आहे, हें दिसून येईल. यांत उद्दाम, उत्कट वा उच्छृंखल प्रीतीचें दर्शन नसेल; पण सुसंस्कृत मनाच्या तळमळींतील शांत, सोशीक व संयमी अशा प्रीतीची हुरहूर आहे.

या संग्रहांतील दुसरा विभाग 'संसारसंगीताचा' आहे. पहिलें महायुद्ध येऊन गेलें असलें, तरी त्यावेळीं भारतांतील जीवन विशेष उध्वस्त झालेलें नव्हतें. परंतु जीवनाचे तट हलके हलके ढासळूं लागले होते. अशा

वेळीं कौटुंबिक सुखाची आशा धरणारीं मनें आपलीं मूल्यें उराशीं घट्ट आवळून धरतांना दिसूं लागलीं. म्हणून 'मातृहृदयाची थोरवी, पुत्रदर्शनाचा ध्यास, अंगाई गीतांतील जादू, दिवंगत आईचा अज्ञातांतून घुमणारा आशीर्वाद, प्रित्याचें प्रेम, भगिनीस करावयाचा विसरलेला नमस्कार, संकट-कालीं सत्यालाच चिकटून बसण्याची प्रतिज्ञा, सहधर्मीणीचा वियोग, घरांत नवीनच येणाऱ्या सुनेचें स्वागत, सुखी संसार किंवा संसाराच्या सुरवातीस असलेली एकटीं दोघें शेवटीं सर्व पांखरें उडून गेल्यामुळे एकटींच राहिलीं, यांतील तीव्र वेदना,' या सर्व भावनांचीं चित्रें सुनीत, भावगीत किंवा कथागीत यांच्या माध्यमाधारें रेखाटलेलीं या विभागांत आढळतील.

'समाज' हा या संग्रहाचा तिसरा विभाग आहे. आपल्या संसारांतून बाहेर पडल्यावर इतरांचें जीवन कसें दिसतें व त्या भोंवतीं समाजाची चौकट कशी आहे हें पहाणें मौजेचें असतें. आपणहि समाजाचे एक घटक असतों. आपल्या सहानुभूतीच्या चष्म्यांतून इतरांच्या जीवनाकडे पाहिल्यास त्यांचीं सुखदुःखें कशीं आहेत, याचीं चित्रें या विभागांत दिसतील. यांत, 'जुन्या जमान्यांत वाढलेली 'परित्यक्ता' आहे; नवीन जमान्यांत राहून अन्याय सहन न करणारी 'टाकलेली' आहे; पुरुष व स्त्री यांच्या पातकी वर्तनाबद्दल केलेल्या पक्षपाती अन्यायाचें चित्र आहे, उपकाराबद्दल अपकार करणाऱ्याच्या वृत्तीचें दर्शन आहे; तसेंच जीवनांत खरा यशस्वी कोण व समाज यशस्वी कुणाला समजतो, कृतज्ञताभाव हें सर्व संस्कृतीचें शिखर कसें आहे, मानवी मनाला मनाचीं व जनाचीं बंधनें कोणतीं किंवा क्षमेने मनांत आणलें तर जग किती सुंदर होईल,' या भावनांचीं चित्रणेंहि आढळतील.

चौथा विभाग 'निसर्गाचा' आहे. त्यांत 'हिरव्या माळरानाचें सौंदर्य वारेपाऊस, शेतकापणीचें भलरीचें गीत, पावसाने ओढ देऊन नंतर केलेल्या वृष्टीचा आनंद, खंडाळ्याच्या घाटांत सर्व धुकेंच धुकें पसरून आपण त्यांत बुडून गेल्याचा अनुभव, शांतिस्थानाची महति, आकाशलिंबानें सुचविलेले विचार, चायनापीक (नैनिताल) वरून दिसणारे मानसमेघ किंवा पक्षि-

जीवनांतील क्षणाच्या विलंबानें ओढवलेल्या आपत्तीची कथा 'या ग्रामीण वा नागर भावांचीं रंगाचित्रें' दिसतील. यांतील प्रत्येक चित्रामागे त्या त्या ठिकाणीं आलेली अनुभूति आहे, आणि तेंच त्याचें वैशिष्ट्य आहे.

काव्यशास्त्राचा व काव्यांचा अभ्यास करीत असतांना, विशेषतः काव्य, प्रतिभा, काव्यार्ची निर्मिति वा सुनीताची बांधणी यासंबंधी मनांत अनेक विचार उत्पन्न होत. यासंबंधीच्या काही उपपत्तीहि मनावरून एखाद्या सोनेरी ढगाप्रमाणें जात. कधी कधी आपण काव्य लिहितों पण तें कितपत टिकाऊ आहे, यासंबंधी शंका उपस्थित होऊन मन व्याकुळ होई. अशा वेळीं जे जे भाव माझ्या मनांत उद्भवले त्यांचीं चित्रें मी पांचव्या विभागांत म्हणजे 'कविता' या विभागांत एकत्रित केलीं आहेत. पहिल्या कवितेंत 'श्रीशारदेला वंदन आहे, तर दुसरींत कवितेचा जन्म कसा होतो हें मी सांगितलें आहे. 'सुनीत' या कवितेंत मीं त्याची 'ताजमहालशीं' तुलना करून, ताजमहालांतील भावना व त्याची कारागिरी यांचा मेळ सुनीतरचनेंत कसा असतो याचें चित्र काढलें आहे; आणि शेवटीं काव्याच्या शाश्वतीसंबंधीचे उद्गार "लक्ष्मीपूजनाच्या सांयकाळीं" या सुनीतांत काढले आहेत.' पुणें येथील फर्ग्युसन कॉलेजच्या टेकडीवरील 'कविकातळा वर' सांयकाळीं अंधारांत बसलों असतां एका दिवाळींत मला जें दृश्य दिसलें व जे विचार मनांत आले ते यांत ग्रथित केले आहेत.

'व्यक्ति व स्थळें' यांना उद्देशून लिहिलेल्या कविता या पुढलि म्हणजे सहाव्या विभागात आहेत. काही व्यक्ति कर्तत्ववान् असतात. तर काही स्थळांच्या मागे थोर व्यक्तींचें कर्तृत्व उभें असल्यामुळें त्यांना तीर्थाची पदवी प्राप्त झालेली असते. म्हणून व्यक्ति काय किंवा स्थळें काय हीं उदात्त भावनांचीं व शाश्वत जीवनमूल्याचीं प्रतीकें आहेत; आणि म्हणूनच तीं समाजाच्या घडणीचीं प्रेरणास्थानें आहेत. मला थोर व्यक्ति, कलावंत, लहान मुलें, भव्य वाडे वा एकाद्या 'माळावरील शिरीषवृक्ष' याबद्दल जी आपुलकी वाटते, त्यामागे ही भावना आहे; आणि तिचाच उमाळा

आल्यावर, 'मी सारंगीवाल्याला आळविलें, हिराबाई बडोदेकरांसारख्या सूरसंगिनीचे स्वरभाव पकडले, सप्तर्षींचें ध्येय सांगितलें, गुरुदेव रवींद्र किंवा नाम. गो. कृ. गोखले यांची महति गाइली, पुण्याच्या शनवारवाड्याच्या उदासवाण्या परिस्थितीची अंतर्भावना व्यक्त केली, मावळ्यांच्या भावना रेखाटल्या, माधवराव पटवर्धनांसारख्या जिवलग मित्राचें घर पाहून आलेले अश्रू ओघळूं दिले, जीवनांतील त्यागाने अलौकिकतेचा प्रत्यय आणून देणाऱ्या माझ्या 'जीवनदीपिकेचें' तेज प्रशंसिलें किंवा सेवानिवृत्तिकालची माझी '**मनीषा**' व्यक्त केली. व्यक्ति किंवा स्थळें हीं प्रेरणेपुरतीं निमित्तमात्र असतात; आपण त्यांच्यांतील गुणांची–म्हणजे जीवनाचीच पूजा बांधीत असतों. हेंच मी या विभागांत केलेलें आहे.

शेवटचा म्हणजे सातवा विभाग हा 'अंतर्जीवनाचा' आहे. सांसारिक आपत्ति किंवा लौकिक जीवनांतील निराशा, जंजाळ, भोग हीं कधी कधी आपणांस आत्मपर बनवितात, अंतर्मुख करतात. अशावेळीं आपण कुणाशींहि बोलूं नये, केवळ आपल्याशींच गुंजत रहावें, अंतर्मुख होऊन आत्मनिरीक्षण करावें किंवा अंतरंगांत काही उदात्त भाव पालवल्यास त्यांच्याशींच खेळत बसावें असें मनाला कधी कधी वाटतें. अशा वेळीं मी आपल्या मनाच्या समाधानासाठीं किंवा आंतमधे गुदमरलेले भाव बाहेर टाकण्यासाठीं 'अभंग' लिहलेले आहेत. या अभंगाच्या निर्मितीला जरी एखादी घटना व एखादी वेळ कारणीभूत झाली असली, तरी त्यांतील भाव केवळ तेथेच थांबलेला नाही. त्याने व्यक्तीमधून समष्टीकडे प्रवास केला आहे. 'त्यांत लौकिक भावना व्यक्त करण्याचा प्रयत्न आहे, मुरलीचे आळविलेले स्वर आहेत, सृष्टीच्या अंतरंगांत चिरंत निनादत असलेलें मूक संगीत ऐकण्याची आतुरता आहे, संसारवनांतील कांट्यांबरोबर फुलणारीं फुलें आहेत, काढणीच्या वेळीं हातास लागणारें भरदार पीक आहे, सहकारवृक्षाची अनपेक्षितपणें कडाडलेली फांदी आहे, पाठीराखा, ध्यान, याचना, यांच्या भक्तींतील मधुर भाव व शेवटीं अनंतस्वरूपी असणाऱ्या जीवनदात्यांचे आभारहि आहेत.' अशा रीतीनें, माझ्या अंतःकरणाचें दार जरा किलकिलें करून मी माझ्या

रसिक वाचकांना माझी आंतली तळमळ काय आहे, तें दाखविण्याचा नम्र प्रयत्न केला आहे.

**'कांचनमेघा'**चें स्थूल:स्वरूप हें असें आहे. यांतील कवितांच्या पाठीशीं माझें लौकिक जीवन व अंतर्जीवन उभें आहे आणि त्यांतूनच या कवितांचा आशय निर्माण झाला आहे. ज्या वृत्तींतून या कविता जन्माला आल्या, त्यांतील आशय माझ्या जीवनाला स्पर्शून गेले, त्यांनी माझे डोळे वेधले व अंतःकरण ओथंबून सोडलें हें खरें आहे. त्यांतून निर्माण झालेल्या आनंदाने प्रेरित होऊन, मला जेवढें सापडलें तेवढें मी रेखाटलें. चित्रकाराच्या सर्वच कलाकृति उत्तम वठतात असें नाही, किंवा गवयाच्या सर्वच चिजा रंगदार होतात असें नाही. मला त्याची पूर्ण जाणीव आहे. आज माझी साहित्यिक वृत्ति काय आहे, हें माझी **'मनीषा'** ( कविता ६९, पा. १२० ) सांगेल. मी कवितेचा व जीवनाचा एक निष्ठावंत उपासक आहे. म्हणून यांपैकी काही अगदी थोड्या कवितांनी जरी रसिकांना रिझविलें व त्यांना त्या त्या मनोवृत्तींचा अनुभव दिला, तरी मला समाधान होईल.

माझे विद्यार्थीमित्र श्री. स. कृ. पाध्ये व अनंतराव लिमये यांनीं **'कांचनमेघ'** प्रकाशित केलें, याबद्दल त्यांचा मी आभारी आहें.

'कांचन' विश्रामबाग
सांगली
सोमवार, २ मे १९५५

**गिरीश**

# कांचनमेघ

## १. गाणाऱ्या मोहिनीस

जाति-मोहिनी

सोड सोड आता अपुल्या गोड मोहिनीला !
मधुर गान ऐकायाला जीव हा भुकेला ! ॥ ध्रु० ॥
जोड नको सारंगीची साथ द्यावयाला,
नको गंडे, वीणेवरती फिरवुं अंगुलीला,
सूर नको, ठेवी खाली ठेव सतारीला,
        एकतार ही बोलेना ऐकुनी सुराला !
विश्व एकदा भरलें हें गोड लकेरीने,
मूक पांखरें मग झालीं; मूक जीव, रानें—
गान एक ऐकायाला बैसलीं मनाने;
        गोड गोड कुणि जादूने भुलविलें जगाला ?
एकतार ही हृदयाची गोड तुझ्या वाटे,
एक तार पावित्र्याची तीजवरी थाटे,
प्रेमरूप झंकाराची तींत तान दाटे,
        एकरूप करिं जीवाला, सूर तुज कशाला ?

२३ जानेवारी, १९२१
पुणें

## २. क्षण भेटलों

गजल – सुनीत, वृत्त – गीतिका

नजरेंतली तव मोहनी मज थांबवी पथिं भारुनी,
वळुनी पुन्हा तव पाहणें शर जाय गे उरिं मारुनी !
क्षण भेटलों, वरसून तू करणार सेक सुधामय,
वदणार जें हंसणें तुझें कथि गोड अंतरिं जाउनी !
क्षण थांबलीस कथावया मज कायसें, मधुरस्वरे !
अडले जरा तव शब्दही अधर प्रकंपित होउनी !
अणि अन्य पाउल वाजलें; दचकून तू मग पाहिलें,
वच कंपिताधरिं राहिले, बघशीं वळून चपापुनी !
मुखिं घर्मबिंदुकणावली, लव गालिं आरुण रक्तिमा,
चपलेक्षणीं लपलीस तू मुरडून कीं बिजली घनीं !
तम लोचनांत दुणावलें; क्षत अंतरीं सखि जाहलें,
उचले न पाउल चंचले, मम चित्त जाय विदारुनी !

विमनस्कता हृदिं सांठली, विरली हवेंत वचें तुझीं !
परि गोड अस्फुट हासणें रमतों अता मनिं आणुनी !

८ ऑगस्ट १९२३
पुणें

## ३. अनुक्त प्रीति

गजल—वृत्त—वारुणी

मुग्धता माझी तुझ्या कां लागणी लावी जिवाला ?
काय बोलू प्रीत ? त्याने जीव कोणाचा निवाला ?
अंतरंगीं गाढ माझ्या जें स्वभावें सांठलेलें,
वाच्यता त्याची करावी वेड हें नाहीं मनाला.
साठलीं मोत्यें तळाशीं भाव नाचे अंतरंगीं,
सागरें का दाविलें हें गूज बोलूनी कुणाला ?
गंध गेला दर्वळूनी पाचवी गुंफेंत पानीं,
काय चांफा बोलुनी, पावित्र्य त्याचें ने लयाला ?
गीत जें जन्मास आलें प्रस्फुरूनी भावयोगें,
काय त्याचा बोलुनी अन्यास दावावा उमाळा ?
तेज रत्नीं, गंध पुष्पीं, झंकृती वीणेंतुनी वा—
मुग्धतेनें सेवितांना, शांति लाभे अंतराला.
तेज वा सौगंध, गाणें होउनी ऐसें मिळावें—
भावनेशीं मी तुझ्या हा एक जीवाला जिव्हाळा !
सन्निधीं वा दूर कोठें राहिलों योगीं वियोगीं,
हा समाधीयोग दे पीयूष माझ्या जीवनाला.
आत्मतृप्ती लाभली, ती गूढ शब्दातीत सारी !
काय ती बोलून दावूं तोटक्या शब्दीं ? कशाला—?

२१ ऑक्टोबर १९३०
फलटण

## ४. हृदयदान

छन्द-ओवी

दान केलें एकदाचें । हृदयाचें जिवेभावें
कीं तू नि मी एक व्हावें.
झालों लीन तुझ्यापायीं । माझें सर्वस्व वेंचून
प्रीती सांगेल ही खूण.
तुज आवडलें जें जें । त्यांत वाटे मज गोडी
प्रीती अशी जिवा जोडी.
तुझ्या शुद्धरूपावीण । नाहीं जगीं कुणी माझें
कानीं तुझा ध्वनि गाजे.
तुझें गाणें वाजवीतों । माझ्या सारंगीवरती
डोळां येतसे भरती.
त्यांत वाटे समाधान, । जीव होई एकतान
धन मला माझें ध्यान.
वृष्टी करीं, करूं नको । मला नसे मुळीं खंत
यांतच मी भाग्यवंत !

२८ ऑगस्ट १९२७
पुणें

## ५. बहाणा



[ मनांतून खरें खरें प्रेम असणाऱ्या, पण वरून निष्प्रेमाचा बहाणा करणाऱ्या आपल्या प्रेयसीच्या पदरांत तिच्या प्रियकराने तिच्या अनुरक्तीचीं प्रत्यंतरें घातलीं आहेत, हीच या कवितेची भूमिका. ]

प्रीति खरी मजवर तव हें काय मज कळेना ?
वरुनि अता कां तू करिसीं व्यर्थ हा बहाणा ? ॥ ध्रु० ॥

नटविसि मम फुलदाणी तू विविध कां फुलांनीं ?
गोल मेज भूषविशीं कां स्वकृत रुमालांनीं ?
आवडे मला त्या चित्रा सजविशीं सुमांनीं ?
नित्य नव्या भेटी मज कां पाठविशीं नाना ?

आवडेल मज ऐशी कां रचिसि केशभूषा ?
तोषतेस कां, आभाळी लेवुनीच वेषा ?
लकब घेउनी माझी कां बोलतेस भाषा ?
नावडे मला जें, कां तू विटोवें तयांना ?

' मुळिं न मला रुचतें तुमचें गान ! '— बोलसीं हें;
चिडविण्यांत मजला, गोडी तुला वाटताहे;
स्तुतिस्तोत्र माझें तूझ्या मात्र मुखीं राहे;
लाविशीं सख्यांना गोडी स्वयें घेत ताना.

कोपतेस तों, तव गालीं उठतसे खळी कां ?
खिजवितेस तों विश्वासें नेत्र चमकती कां ?
लाडकेंच बोलायाला येसि मग पुन्हा कां ?
बोलतां न मी, ढाळिसिं कां गुप्त आसवांना ?

भेटवेळ टळतां मम, कां लागसीं झुराया ?
जिववितेस जीवाला कां पूजुन मम छाया ?
आणि हळुच मागुन येउन, मागतां पहाया,
लपविसिं ती लाजत कां तू, देत नकारांना ?

२८ ऑक्टोबर १९२७
सोलापूर

## ६. हृद्गत

सुनीत—शा. वि.

तू येणार म्हणून लोचन तुझ्या मार्गाकडे लागले,
देवी, ध्यान तुझें करीत, हृदय प्रीतीमधें भागलें;
संगीतध्वनि गोड, दिव्य उठला मद्रोमरोमांतुनी,
आनंदांत विरून जाय मन हें ध्येयावरी गुंगुनी !
जाईची फुलली मुलायम लता दारीं कमानीवर,
वेळा रम्य पहाटची, दरवळे सौगंध वाऱ्यावर;
होती आरुण कांतिनें विनटली शुक्रप्रभा मोहक,
न्याहाळीत तिला तिथेंच ठरलों मार्गप्रतीक्षोत्सुक !
होतें खोल किती किती दडविलें मी गौप्य माझें, मनीं,
सांगावें तुजला म्हणून पडली मातें किती मोहनी;
येतां तू स्मितचंद्रिका वरसली माझ्यावरी अद्भुत,
हातीं मी तव गेंद तोडुनि दिला, केलें तुझें स्वागत !

आता बोलवतें न; काय तुज मी सांगू कशी हो गत !
पुष्पांनाच विचार; सर्व तुजला तीं सांगतीं हृद्गत !

१२ ऑक्टोबर १९२७
पुणें

## ७. भेटीनंतर

सुनीत –शा. वि.

केव्हां येशिल तू म्हणोनि बघतों मी वाट रात्रंदिनीं,
    माझें अंतर आंतुनी झुरुनिया व्याकूळतें सारखें !
दाटोनी कढ तीव्र गूढ हृदयीं वाटे नको मेदिनी,
    वाढे आंतर दुक्ख; काय न कळे झालें असें पारखें !
ध्यातों मूर्ति तुझी धरून हृदयीं नामावली बोलतों,
    प्रेमें वेंगुनिया स्वहस्त चरणीं मी घालितों गे, मिठी;
त्यांहीं भाव निवे न; उत्कट परी जोरांत आंदोलतो,
    लागे ध्यास तुझा, जिवा न दिसतें काहीच दूजें दिठीं !
घेवोनी मग छान कागद झणीं आलेखितों अंतर,
    प्रीतीचें हितगूज सांगत तुला, रंगून जातों सर्वे;
वाढोनी परि पूर्वभाव, हळवें हेलावतें नंतर,
    ‘ जा भेटून ’ असें पुन्हा विनवितों, गाळीत मी आसवें !

येतां तू मन कां उदासुनि परी जातें असें नाकळे !
    पत्रांतील सुखैकता हरपुनी काव्यात्मता कां ढळे ?

२२ सप्टेंबर १९२८
पुणें

## ८. सरस्वती

सुनीत – शा. वि.

‘ भेटीने विरसें कसें मन ? ’ असें चित्तीं उठे काहुर,
येती तर्कवितर्क आणि हलती लाटा किती अंतरीं;
किंवा आंतर दिव्य लावि मजला सौंदर्य हें हुर्हुर;
जातों गुंगुन कां मनांत न तरी ‘ रम्याणि वीक्ष्य ’–स्वरीं ?
किंवा बंधुपित्यांसवें स्वभगिनीमातेसवें बोलुनी–
जाई वेळ तुझा किती, बहुदिसां ही भेट झाल्यामुळें;
पेटे आंत तरीच मत्सर, मला हेटाळणी वाटुनी,
रागेजून, उदासतें मन असें प्रेमैकभावें खुळें ?
माझी दृष्ट मलाच काय अथवा ही नाकळे लागतां–
हृत्कासार गढूळतें, विमलता लोपूनि गेल्यावरी;
येण्याच्या तव कल्पनेंत भरली जी गोड काव्यात्मता
तू आल्यावर – हाय ! आटुन कशी ती जाय वेगें झरी !

सारे हें मनिंचेच खेळ ! हृदयीं जी निर्मला वाहते—
नित्य प्रीति-सरस्वती, क्षण अशी ती गुप्तता पावते !

२७ सप्टेंबर १९२८
पुणें

## ९. लाजविलेला गुलाब

सुनीत – शा. वि.

होती सांज; दुरून मार्गि मजला प्रेमें गवाक्षांतुनी–
पाहोनी, अणि खालती प्रियसखी भेटावया धावली;
दाराआड परंतु मीच लपतां, गेली पुढे धावुनी—
वेणींतून गुलाबपुष्प गळलें– तो अंतरीं लाजली !
झाली खिन्न मनीं सखी; सुमन मी आनंदलों घेउनी,
झाले गालगुलाब पांडुर तिचे; मी हासलों पाहुनी !
दृष्टी फेकुनि भोवती टकमका पाहे मनोहारिणी,
होई पूर्ण निराश कीं ‘ फसविती डोळे असे ’ वाटुनी !
दीर्घोच्छ्वासचि सोडुनी परतली दारामधें पातली,
डोळ्यांतून विषण्ण तोंच पदरीं प्रेमासवें सांडलीं;
गेली पाउल आंत एक, हळु तों मी जाउनी मागुनी,
हातांतील गुलाब खोवुनी दिला वेणीमधें हासुनी !

भीतीनें मुरडून मान वदली ‘ हें काय बाई असें ! ’
‘ ओले गालगुलाब लाजविति या पुष्पा ’– वदे मी असें !

१९ मे १९२३
महाबळेश्वर

## १०. ध्यास

छन्द—ओवी

किती दिन लागे ध्यास । तुझा, व्याकूळलें फार
प्रेम माझें तुझ्यावर !
आली अनुभूति मागे । गेलें शहारुनी अंग
झालें तुझ्यामधे दंग !
तुझी एक मूर्ति दिसे । गोड माझ्या नयनांला
विरंगुळा जिवा झाला.
हृदयांत पूजीतसें । तुज प्रेमें आसवांनीं
रमुनिया तुझ्या ध्यानीं.
ओठांतून पाझरतें । तुझ्या नांवाचें संगीत
हात तेंच लिहीतात.
कुणी काही बोलो, वाटे । मला, तुझी गोड वाणी
कानीं माझ्या गाते गाणीं.
तुझ्या ताल्सुरांवर । माझें जीवित वाहातें
त्यांत अथांग नहातें !
काय पाहूं, काय पूजूं । काय गाऊं, श्रवूं अन्य !
तुझ्यामुळें झालें धन्य !

१७ फेब्रुवारी १९२८
पुणें

## ११. तुझ्यावांचून

छन्द—ओवी

[ आपल्या आयुष्यांतील बहारीचे प्रसंग पहाण्यास प्रिय व्यक्ति जवळ नसली कीं काय वाटतें, हीच या कवितेची भूमिका. ]

खेळ चाले भोवताली । आनंदाला येई पूर
पोटीं माझ्याच हुर्हूर !
वारा वाहे झुळूझुळू । दाटे फुलांतला वास
नाही परी तुझा श्वास !
तेज फाके नयनांचें । दीप उजळिती सृष्टी
कुठे परी तुझी दृष्टी !
चढे रंग गायनाला । माझी लकेरतां तान
परि कुठे तुझे कान !
अणूमाजीं हसे कोंदे । बहारुनी माझें जिणें
स्मित परी तुझें उणें !
आनंदाश्रू ओघळले । भारावलेल्यांचे किती
कुठे परी तुझे मोती !
हृदयांनीं हृदयांत । किती ओतलें अमृत
वाटे, माझें झालें मृत !
करुणल्या तरी माझ्या । आनंदासवांच्या राशी
बोलूं परी कुणापाशीं !

२० डिसेंबर १९२८
पुणें

## १२. भास

जाति—मनमोहन

तव भास अंतरा झाला, मन रमतां, मोहना ।। ध्रु० ।।

स्पर्शतां तृणें मखमाली,
स्मृति कसलीशी मज झाली,
शोधाया त्यांतच लागे मी अपुल्या जीवना !

हासतीं फुलें भवताली,
मधुर ये फळांवर लाली,
स्मितसाम्य तुझ्या अधरींचें मम खिळवी लोचना !

वाहत ये झुळझुळ वारा,
दरवळला परिमळ सारा,
तव हृदयपुष्पगंधाची अनुभवितें कल्पना !

संगीतलकेरी बहरे,
आनंद अणूंतून पसरे,
झंकार हृदयवीणेचा तव दे कीं चेतना !

किति मोहक आरुण कांती !
मज वेड लावि एकांतीं,
अनुराग तुझ्या हृदयींचा कीं फुलवी मन्मना !

तव छाया ठायीं ठायीं,
हुरहुरे, बघुन मी बाई,
काधि भास सत्य हे होती, मम हरती वेदना ?

३० सप्टेंबर १९२९
पुणें

## १३. मधुरमीलन

जाति—मोहिनी

मधुर विमल हृदयीं कैशी चंद्रिका उदेली !
काय, कुठून गोड तुवां ही जादुगिरी केली ! ॥ ध्रु० ॥

वेड एक तव बोलाचें लागलें जिवाला,
कान देत बसते नादें शून्य दश दिशांला,
बांसरीलकेरीसम तो ध्वनि कसा निमाला !
तरल तरंगें ही सृष्टी ल्हरुन कीं ठेली ?

साजली किती हास्याची प्रभा मधुर ओठीं !
तेज माणकांच्या विलसे हेंच काय पोटीं ?
मोहनी तियेची चमके लोचनांत मोठी;
वेड लावुनी हृदया जी ज्योत नितळ मेली !

तीच तान किंवा भरते अंतरांत सूर ?
तेंच तेज हृदयीं आणी काय अमृतपूर ?
कोण ओळखीचें बोले, हासुनी अदूर ?
स्पर्श मोहरे कोणाचा ? कोण मला झेली ?

१९ ऑगस्ट १९२९
पुणें

## १४. तेढ

छन्द—चंद्रकांत

**[ प्रेमकलहानंतर साहजिक झालेली अबोल्याची दीर्घ शिक्षा सहन न झाल्यामुळें, व्याकूळ झालेली प्रेयसी प्रियकराच्या सहभावनेची याचना करते, हीच या कवितेची भूमिका. ]**

किती पाहू वाट तूझी लागे, जिवा वेड ! बाई
लागे जिवा वेड,
अजूनी का नाहीं गेली, अंतरीची तेढ ! बाई
अंतरीची तेढ.
कसें गेलें बोलूनी मी, आला किती राग ! बाई
आला किती राग,
कुठवर जीवा आता, लावणार आग ! बाई
लावणार आग !
कशी आली वेळ तरी ! बसे कसा ताण ! बाई
बसे कसा ताण,
परतवूं कसा आता, सुटलेला बाण ! बाई
सुटलेला बाण !
घाव लागे तुज आणि झालें मीं घायाळ ! बाई
झालें मी घायाळ ।
आसवांनीं भडके हा, पेटलेला जाळ ! बाई
पेटलेला जाळ !

समजावूं तरी कशी ! झाला निरुपाय ! बाई
झाला निरुपाय !
विझणार कशी जीवा, लागलेली हाय ! बाई
लागलेली हाय !
व्याकळून गेलें सख्या ! काय देऊं मोल ! बाई
काय देऊं मोल,
ऐकूं येतील का कधीं, दिल्रुब्याचें बोल ! बाई
दिल्रुब्याचें बोल !

८ फेब्रुवारी १९३२
फलटण

## १५. विरहिणी

जाति—बालमुकुंद

मज चैन नसे ग कशि मी रिझवूं मना !
घडि घडी मनीं, स्मरण होउनी । सखये, दिन जाइना ! ।। ध्रु० ।।

किती लोचन भरले जातांना येथुनी !
किती आंतुन आलें हृदय सखे दाटुनी !
परि आवरिलें मन होतें किति आंतुनी !
ओतिलें झणीं हृदय, घेउनी— । बाळाच्या चुंबना !

किती दिवसारात्रीं बोलतसू सारखें !
कधि बोल न सरले, वेळ न पुरला सखे !
कशि बोलत होतों आणि किती कौतुकें !
भाषणीं सुधा पिउनि मी मुधा । न्याहाळी लोचना !

कधि ऐकवुनी मज सुंदर गाणीं जुनी,
कधि नव हृदयंगम काव्यसुधा पाजुनी,
मज मोहनमंत्रें ठेवियलें भारुनी,
अजूनि ते परी सूर अंतरीं । विरसविती जीवना !

कधि मांडण घरची बघती न्याहाळुनी,
सौंदर्य-सजावट खोलींतिल पाहुनी,
प्रिय निशिगंधा वा वाढविं मी उपवनीं,
बघुनि हें, मनीं हसति चोरुनी ! । हरति किती यातना !

कधि लागे हुरहुर काहीतरि अंतरा;
मज शांतवि माझा प्रेमळतेचा झरा;
निरवितां मान मी खांद्यावरती जरा,
चांदणें फुले, त्यांत मन झुले ! । सांगूं परि ग कुणा !

७ नोव्हेंबर १९२७
सोलापूर

## १६. तन्मयता

छंद—ओवी

[ आपल्याला प्रिय असलेल्या पुरुषाची प्रेयसी कुणि तरी अन्य स्त्री असावी, अशा शंकेने त्याच्यावर अनुरक्त असलेली एक स्त्री त्याच्या मनाचा, स्वार्थी दृष्टीने, त्याला न कळत, ठाव काढीत आहे, हीच या कवितेची भूमिका. ]

कशी देई कान, पहा, तुझें निघतां बोलणें,
किती सानंद डोलणें !

काम थांबे हातांतलें, आतुर ती किती होई,
तहानेली पाहे पोई !

नांव तुझें साभिमान घेतां, किती भारावते,
डोळां सुमन दंवतें !

बोलतां मी काही, छटा मुखीं वाहे कशी त्याची,
बिंबें जळांत ढगाचीं !

तुझ्या सुखीं हसूं ओठीं, दु:खीं आसवांचा सडा,
ऊन, पाऊस की खडा !

तुझा पुरुषार्थ सांगतांच रोमांचते तनू,
अभिनंदन तें जणूं !

थोरवीचें तुझ्या काही, कुणीं बोलतां गौरवें,
नेत्र मिटतात भावें !

कशी राहून अबोल, तुझें वर्णन ऐकवी ?
मूक गाई भावकावि !

काय जादू तरी अशी तुझी तिजला भारीते—
आणि ताप निवारीते ?

७ जुलै १९३२
फलटण

## १७. पूजास्थान

गज्जल– तुंगभद्रा–त्रिगणी–अपूर्ण

प्रेम केलें काय झाला हा गुन्हा ?
दोषुनी, आता सुधारे का पुन्हा ! ॥ ध्रु० ॥

जाहली जी अंतराची काहली,
काय वाटे दड झाला तो उणा ?

द्यावया शिक्षा म्हणूनी आणखी–
मूर्तिपूजा काढिसीं माझी पुन्हा ?

अंतराचा धर्म त्याने पाळिला,
बोल याचा लावणें कोणी कुणा ?

स्नेह जाणे स्नेहभाषा आपुली,
स्नेह माझा त्यांतुनी आहे जुना !

पूजनें या आजवेरी तोषलों,
काय देव्हारा अता पाहूं सुना !

प्रेय तूझें तेंच माझें जीवनीं,
तोषतां तू भाव माझा हो दुणा !

त्यागितों सर्वस्व आता संयमें,
प्रीत जाणे त्यागभावाच्या खुणा !

ही पहा काढून मूर्ती टाकिली,
थोर पूजास्थान मी मानी गुणा !

१४ मार्च १९३१
फलटण

## १८. गोड आठवण

गज्जल : वृत्त—पांडव

ठेविलें पाऊल दारीं जों न तूझ्या, मंजुले !
गोड गाणें ऐकिलें, जें तूं स्वतांशीं गुंजिलें !

पाठमोरी बैसुनी बागेमधें तू अंगणीं,
आपुल्याशीं रंगशीं, होतें जरासें सांजलें !
गुल्मुशीचा हार हातीं झर्झरा गे, गुंफुनीं,
सावरोनी अंचळातें, वायुला तू शासिलें !

अंजिरी रंगांत शोभे रेशमी पाठीवरी—
शुभ्रता आंतील किंचित्; रंग रंगानें खुले !
सैल अंबाड्यावरी शोभे कडेची लोकर,
कीं सुरंगी इन्द्रचापा कृष्णमेघीं निर्मिलें !

गाठल्या केसावरी गे पाचमर्वा घालुनी,
सोनचाप्याचें टपोरें फूल होतें खोविलें !
थांबलों, निःशब्द गेलों, सन्निधीं ठेलों जरा;
मोहनी घालून कोणी गे कळेना ओढिलें !

रंगलें गाणें ! लकेरीसंगतीं मी गुंगलों,
मोडवेना त्वत्समाधी, त्या स्वरांनीं मोहिलें !
'गुंफितांना हार, गावें तू असें गोड स्वरें,
चोरुनी ऐकून मीही गे, रमावें'— वाटलें !

तोंच आली हाक ! गानाची समाधी भंगली !
नीट तू गेलीस; मागें ना वळूनी पाहिलें !
गुंफतांना सांडलेलीं वेचिलीं हातीं फुलें;
तींच आता हुंगतांना अंतर प्रेमें उले !

२८ ऑगस्ट १९२३
पुणें

## १९. शूर्पणखा



[ हें स्त्रीगीत ‘ अहं प्रभावसम्पन्ना स्वच्छन्दबलगामिनी । चिराय भव भर्ता मे सीतया किं करिष्यसि ’ या रामायणांतील श्लोकाच्या आधारें रचिलें आहे. बनवासांत रामसीता एकत्र बसलीं असतां शूर्पणखा राक्षसी उत्तम वस्त्रालंकारांनीं नटून, रामाला मोहनी घालण्यास आली आहे, अशी या कवितेची भूमिका आहे. ]

गेलें तुझ्यावर जडून । रामा, मन गेलें तुझ्यावर जडून ॥ ध्रु० ॥

किती नटून् सजून मी आलें,
किती अलंकार हे ल्यालें,
किती नाजूक गेलें बाइ होऊन ! रामा ०

हीं आभाळी वसनें मला—
प्रिय तुझ्यासाठी, घननिळा !
किती घेसीं आतां जिव ओढून ! रामा ०

तुझ्या रूपाने मन मोहिलें !
तुझ्या पायाशिं तन वाहिलें,
चल भेटूं आता कडकडून ! रामा ०

मी प्रभावशालिनि सती;
कां सीतेवर धरिशीं प्रीती ?
जिवलगा तिला चल सोडून ! रामा ०

दृष्टि रामाची स्तिमिताचि झाली !
सीतामाई हसूं लागली !
शूर्पणखा गेली मग चिडून ! रामा ०

धावे खायास मायाविनी;
लक्ष्मणाने तों येउनी–
परतवीली नाककान कापून ! रामा ०

१० नोव्हेम्बर १९२५
पुणें

## २०. गानमोहिता

जाति—बांसरी

' [ ही कविता म्हणजे स्वामी विवेकानंद यांच्या जीवनांतील एका रहस्याची स्मृतिच होय. नरेंद्र-या वेळी एम्. ए. च्या अभ्यासासाठीं कलकत्त्यास एका रस्त्याकडेच्या. खोलींत रहात असे. सकाळीं-सायंकाळीं नित्य तंबोऱ्यावर आपल्या मधुर कंठाचे आलाप छेडून, एकतान वृत्तीनें गात, ध्यान करावें हा त्याचा क्रम असे. तो गाऊं लागला कीं समोरच्या घरांतील एक गतधवा तरुणी आपल्या दारांत येऊन उभी राही व त्याच्या गाण्यांत रमून जाई. एक दिवस नरेंद्र गाण्यांत पूर्ण रंगला व ती तरुणी आपलें देहभान विसरून, आपलें घर सोडून त्याच्या खोलींत येऊन समोर उभी राहिली ! गाणें संपल्यावर नरेंद्रानें तिला पाहिलें व –' आपण इथे कां आला ? ' असें विचारलें. ' माझें आपणांवर प्रेम जडलें आहे; आपण मजबरोबर विवाह करून संसार करावा, ही प्रेमयाचना करण्यास मी आलें आहे '— असें ती म्हणाली. नरेंद्रानें तिची समजूत घालून तिला परत पाठविलें आणि ती खोली तात्काल सोडली ! पुढील कवितेंतील संवाद या सत्यकथेवरआधारलेला आहे. ]

कोण तू कुठोनि येसि, कां हळूच मंदिरीं ?  
मोहवी मनास रम्य हास्यतेज सुंदरी ! ॥ ध्रु० ॥

तू सती जगातली,  
अप्सरा नभांतली,  
स्वर्गदेव ासजून येसि वा धरेवरी ?  
चंचला दगांतुनी,  
मोहिनी प्रभेंतुनी,  
विलसतेस की उषाच मूर्तिमंत माधुरी ?

मंजु गान रंगलें,
एकतान, मंगले !
प्रगटलीस त्यांतुनी सुरेल रागिणी खरी ?

सुंदरी वसुंधरा–
पातलीस मंदिरा,
काव्यभा प्रसन्न वा विराजलीस ईश्वरी ?

अंतरंगमाधुरी–
रंगली मुखावरी,
काय गे, तरंगती तरंग कोमलांतरीं ?

कोण तू०

हाय ! गीत ऐकिलें !
आणि चित्त भारलें !
लोभलें कितीक दीस त्यांत आपुल्या घरीं !

अंतरीं कुणी शिरे,
चित्त होय बावरें !
थांबवी परंतु वेड हीच गीतबांसरी !

सूर आज नादले,
दारिं तोंच पातलें,
अन् कुणीं, कसें; कळे न आणिलें इथें वरी !

कोण तूं०

काय मोहवी असें—
गीत लावुनी पिसें !
ठाउकें न झंकृती मदीय ही कृती करी !

चारुशील देवते !
भगिनि, गानमोहिते !
बंधु मी, असाच लोभ अंतरीं सदा धरीं !

कोण तूं ०

परत त्याच पावलीं—
सुंदरीच परतली !
अश्रुबिंदु ठिबकले, जणूं जिव्हार भूवरी !

त्यागिली तयें विणा,
आवरूनिया मना !
ध्येयमग्न तो कुठे निघून जाय सत्वरीं !

११ ऑगस्ट १९२८
पुणें

## २१. बकुळा

जाति–स्वर्गंगा

हिरवी झाडी मुळामुठेच्या दोहितटांवर ही दाट,
इकडे पेरूबाग आणखी तिकडे मळ्यांचा थाट !
संगमलेला ओघ नद्यांचा गभीर हा मधुनी वाहे,
रानफुलांचा पाणवेलिंचा वास तटीं दरवळताहे.
आषाढाच्या सरी लागल्या; रिपरिपली वरुनी धार !
रात्र पसरली घोर; भोवती भयाण पडला अंधार !
झाकळून हें आलें पुरतें; काजळ आकाश वेढी !
वरती तारे आणि खालती गाढ झोपले नावाडी !
वस्त्र फाटकें अंगावर, परि काचा कसुनी ही धीट
नावाड्याची पोर चालली बकुळा अंधारीं नीट.
खुंटवलेली नाव सोडुनी तिने ढकलेली पाण्यांत !
वीज कडाडे ! मेघ मातले अपुल्या तांडवगाण्यांत !
वरती भवती पाहून वल्हें आवेगाने ती मारी,
भयाण पाण्यामधुनी नौका चालुन, भिजली सुकुमारी !
अंतर्यामीं घोर निराशा, खळबळ जंगी जरी चाले,
कौशल्यानें जळांत वल्हें तरुणीचें तरि ही हाले.
काळोखाने जरी ग्रासिलें पाण्यामध्यें चहुकडुनी,
प्रीत दाखवी मार्ग आपुला विद्युद्रूपें कडकडुनी !
सर सर पाणी काटुन नौका अचुक लागली पैलथडी !
चित्र उराशीं हात घेउनी बकुळा राहे उभी खडी !

‘ उटा चंद्रुजी ! उटा बिगिबिगि ! ’– करुण हाक मारून अशी,
हळूच उठवी कोपींमधला प्रिय ती अपुला जीवशशी.
डोळे चोळून, बघतां त्याला दिसली गडणी भिजलेली;
डोक्यावरली धार अजूनी निथळत होती भूमितलीं !
‘ कोन बकूळे !—इकत्या रातीं !, घ्ये, पांघर घ्वांगडि आदी । ’
‘ —थांबा माज्या जिवा ! ’– बोलली गहिंवरुनी वाणी साधी.
‘ दूर जरा व्हा ! बकुळा न्हाई तुमची ! बोला दुरुन् मशीं !
लगान परवा; शेवटची म्हुन् आल्यें भेटायास अशी । ’
कंठ दाटुनी मुसूंमुसूं ती रडूं लागली गहिंवरुनी !
धार गळाली ! स्तब्ध चंद्रुजी झाला हृदयीं हळहळुनी !

‘ जाउं नगं तू काकडलेली ! न्हआ ! ’–‘ चंद्रुजी हें काय !
अबरू अपुली अन् बाची बी–नगं सोडत्यें ह्ये पाय ! ’
वीज कडकडे पुन्हा अंबरीं, वळली बकुळेची पाठ;
स्तिमित होउनी परि तो राहे तिथेच अंधारीं ताठ !
मुसळधार तो पडूं लागली डोक्यावर त्याच्या धार,
शून्य मनाने परि तो राहे सोशित जलदाचे वार !
पुन्हा नदीच्या अथांग पात्रीं वीज कडाडे चमकून,
क्षणैक नौका पुरांत दिसली खालीवर हेलावून !
लाटावरती लाटा येउन फुगलें जळ अपरंपार,
अंधारांतुन डोक्यावरती वसला वाणांचा मार !

भयाण पात्रांतील भोवरे चुकवायाला अंधारीं—
दोहातांनी वल्हीं मारुनि बकुळा थकली मग भारी !
हातामधली गळली शक्ती, नाव लागली धारेला !
गर गर गोते खाया लागे, धीर तिचा न जरी खचला !
उपाय हरले अखेर सारे, सावरण्याला नेंच वाव,
एकच उठला शब्द—' चंद्रुजी ! ' आणि जळीं बुडाली नाव !
रम्य कोवळे किरण सकाळीं रविने खाली पाजळले;
भिउन पित्यानें, गडी आपुले शोधाया तिज पाठविले !
हाय ! कलेवर चंद्रोजीचें दिसलें एकाला रानीं !
आणि भवतिची हिरवीपिवळी झाडी भिजली अश्रूंनी !

३१ डिसेंबर १९२५
सोलापूर

## २२. जीवितेश्वरीस

गज़ल–सुनीत, वृत्त–भिल्लीण

तूं एक जिवा शांति दिली प्रेमळ भावें,
चित्तांत तुझें स्तोत्र किती घोळुन गावें !
हा भोंवति जंजाळ जिवा जाळित जाई,
येतांच तुझी बोलसुधा, चित्त विसावें !
तापून किती जाय शिरःप्रांत उन्हानें,
तूं वेल, चढूनी वरती छत्र धरावें !
सावेग खळाळून जळें लोंचनिं येतां,
तूं संयतचित्तें पदरीं नेत्र पुसावे !
अस्वस्थ करी घोर जिवा विश्वतमिस्रा,
हासून किती गोड जगा तूं उजळावें !
लागून जिवा आग किती होय कहाली !
कां शब्दपयःस्रोत तुझा आज दुरावे ?

ही कोण हृदीं कोमल छेडी स्वरमाला ?
का भाव तुझा येउन रूपांतरिं, पावे ?

२२ जुलै १९३३
फलटण

## २३. आवाहन

जाति—मुद्रिका

[ सौभाग्यसमृद्धि करणारी नववधू–स्नुषा–आपल्या घरांत येत आहे, अशा वेळीं वडील माणसांनी करावयाच्या सुस्वागताचें हें शब्दचित्र आहे. ]

ये मंगलमय विमलते ! उजळ या घरा,
स्वर झंकारुन ये वीणे ! शांतवाया अंतरा. ।। ध्रु० ।।

लोटून मार्ग ठेविले,
संमार्जनजळ शिंपिलें,
रांगोळ्या काढुन किती सजविली धरा !
सोनेरी उधळुन फुलें,
रविनें हे पथ फुलविले,
हीं यशोधनें त्यावरी विखुरलीं जरा !
तूं सरस्वती कोमला,
कमलेचें वैभव तुला,
उमळेल तव पदार्पणीं सुखाचा झरा !
तव सुस्मित-तेजावली—
सदनांत मधुर फाकली,
तेजाळुन जाइल वस्तु-वस्तुची जरा !
तव झंकारांच्या स्वनें,
मोहरातिल मधुगायनें,
स्वरभाव गोड होईल जिवा आसरा !

दृष्टिचें तुझ्या चांदणें,
सकलांचें होइल जिणें,
फुलतील भाव, येईल बहर परिसरा !

वात्सल्यफुलें हीं करीं—
घेऊन थांबलों घरीं,
घरभरणी होता फुलेल हा उंबरा !

२० नोव्हेंबर, १९४१
विश्रामबाग, सांगली

## २४. चांदण्यांतील भेट !

जाति–केशवकरणी

[ आपला एकुलता एक मुलगा मृत झाल्यामुळे, भ्रांतचित्त झालेली एक आई, वेड्या आशेने 'त्याची सावली तरी पुन्हा कुठे दिसेल का', म्हणून तळमळत आहे. 'मृताची सावली चांदण्या रात्रीं दिसते,' असें कुणीसें तिला सांगितलें. म्हणून, एका चांदण्या मध्यरात्रीं कृष्णाकोयना-संगमानजिक असलेल्या जुन्या किल्ल्यांतील आपल्या घराच्या अंगणांत चिंचेच्या झाडाखाली उभी राहून, ती शोधक नजरेने इकडे तिकडे न्याहाळीत आहे, नि तोंडाने पुढील शब्द उच्चारीत आहे, ही या कवितेची भूमिका. ]

जीव तुझ्यास्तव शिणला बाळा ! व्याकुळलें अंतरीं !
कुठे मी शोधूं तुजला तरी ? ॥ ध्रु० ॥

मज भयाण सारें भासे या अंगणीं ?
किती उसासुनी मी न्याहाळूं चांदणी ?
कां चांदण्यांत या हिरमुसले हे मणी ?
आणि कोणती मूर्त सावळी समजूं तव अंबरीं ?
कुठे मी शोधूं तुजला तरी ?

चांदणे बहरलें किति हें चोहीकडे !
धवळलें संगमीं पात्र आणि हे कडे !
भेसूर शांतता छायेंतुन कां दडे ?
निश्चल पानें ! वारा ! पाणी ! बघतीं अशि कां परी ?
कुठे मी शोधूं तुजला तरी ?

येऊन समोरुन कृष्णा अन् कोयना—
भेटती परस्पर, देउन आलिंगना;
आनंद जाहला प्रीतिसंगमीं मना;
शमवाया पोटाग कधी मी पोटाशीं तुज धरीं ?
कुठे मी शोधूं तुजला तरी ?

चांदण्यांत दिसते केव्हा तव सावली,
बघण्यांस धावलें म्हणुन, मूर्त सावळी !
किति कणाकणांतुन ऐकूं तव चाहुली !
झुळुक, अहाहा ! हले सावली कसली तीरावरी ?
कुठे मी शोधूं तुजला तरी ?

१२ जुलै, १९३६
पुणें

## २५. मातृहृदय !

जाति– दिंडी

[ आईने बाळाकरिता केलेला स्वार्थत्याग अद्वितीय असतो. आपल्या गोड गीताने जगाला मोहनी घालणाऱ्या एका ध्येयवादी आईनें आपल्या बाळाच्या दुःखासाठी कोणता स्वार्थत्याग केला, हीच या कवितेची भूमिका. ]

१

किती होती कंठांत तिच्या गोडी !
किती भावस्वरजादु जीव ओढी !
तिची सहजस्फुट ऐकुनी लकेर,
रसिक पर्युत्सुक होय हृदीं फार !

फिका वीणाझंकार गमे काना,
व्यर्थ बीनाच्या कोमलांग ताना;
मधुर नाजुक जलतरंगांत नाही–
अशी आलापीं फिरत तिच्या राही.

तिनें गानें संसार गोड केला;
तिच्या आलापें दुःखभाग गेला;
हसुन अंगाई बाळकास गाई,
सदा गुंगत झोपून तोहि जाई.

कधी रोग्याला ऐकवून गाणीं,–
हृदय फुलवी ती निरामय सुरांनीं.

तिने भरलें संगीत भोवताले,
तिचें गाणें रसरूपगंध झाले !

२

तिच्या बाळें अनुकरण तिचें केलें,
लोक आलापीं मोहुनीच गेले;
याच आनंदें विस्मरून भान,
कधी घेई ती गोड गोड तान !

" सुदैवानें आपणां लाभलेलें—
असें बाळाला आपल्या दिलेलें;
गुणोत्कर्षें तो चालवील नांव,
अंतरींचा पटवील जना भाव !

म्हणुन ओजस्वी मधुर वीरगाणीं,
जना देईल तो प्रेरणा सुरांनी;
आणि होउन संचार भावनेचा,
भारताच्या ये दिवस मुक्ततेचा !– "

असें पुढती ती स्वप्न मधुर पाहे,
आणि शिकवण बाळास देत राहे;
तिचें स्फूर्तिप्रद गान पडो कानीं,
म्हणुन फिरती जन त्याच वीथिकांनीं !

## ३

परी ठरलें हें क्षणिक सौख्य सारें !
बाळकंठाला घेरिलें विकारें !
अन्न तुटलें घोटे न जरा पाणी
हाय ! जाऊं लागली खोल वाणी ! !

कृशांगाला मग शक्ति आणण्याला,
तिनें अपुलें घातलें रक्त त्याला !
मायभावें उपचार सर्व झाले,
कलाशास्त्रांचे यत्नही निमाले !

पुढे रुग्णालयिं वैद्यराजयानें—
शस्त्र चालविलें कुशल मृदु कराने ;
क्रिया कंठावर यशस्वी जहाली,
परी वाचा सोडून त्यास गेली ! !

जीव जगला, पण लकेरी निमाली !
माय कायमची खिन्नवदन झाली !
बोल नाहीं काढिला बालकानें !
पुन्हा न कधीं गाइलें तिने गाणें ! !

३० ऑक्टोबर १९३५
पुणें

## २६. गानचातुरी

जाति—शुभवदना

[ आईच्या हातांत नि आवाजांत अशी काय जादू भरलेली असते, की ताईने आपल्या हातून निजूं नये, नि आईच्या नुसत्या एका झोक्याने नि लकेरिने निजावें ! थोरपणीं होणारी याची आठवण हीच या कवितेची भूमिका. ]

घुमति तुझे स्वर मंजुळ करुण किती कानीं,
हुरहूरतें मन वेडें त्याच कसें ध्यानीं ! ॥ ध्रु० ॥

अंधारुन वाड्यामधि चहूकडून आलें,
मिणमिणतें तेज जरा माजघरीं ठेलें;
खळबळ करि झोपेला आलेली ताई,
सांजवात ती न तुला पुरती करुं देई;
पाळण्यांत घालुनि तिज जोजविसी गानीं ?

वर खाली भावमधुर सूर तुझा जाई,
करकरुनी ताल तया पाळणाहि देई;
जादूची मोहनीच पसरुनिया भोती,
गुंगाया हळू लागे कण्हत बाळ तों ती;
गोड तरंगांत निजे मधुरमीलनांनी !

काढुनि हलकेच हात पाळण्यावरूनी,
बघसि गानचातुरीच आपुली दुरूनी;
हासुनि घरवात करायास आंत जाशीं,
आणि उभा मी तसाच एक जिन्यापाशीं !
हाय ! काय, कधि फिरेन त्या जीवनयानीं ?

२९ डिसेंबर १९३४
पुणें

## २७. आईचा आशीर्वाद

छंद–ओवी

[ वयाच्या चवथ्या वर्षीं आई वारलेल्या नि तेव्हापासून आज बारा तेरा वर्षेंपर्यंत घरांतील वडीलधाऱ्यांनीं उत्तम संगोपन करून प्रेमाने वाढविलेल्या एका कन्येचें आज लग्न आहे. लग्नमंडपांत आशीर्वाद देण्यासाठी अनेक आप्तेष्ट आले आहेत. आपली मुलगी सुस्थळीं पडून तिच्या जन्माचें कल्याण व्हावें, म्हणून कन्येच्या भोवती भोवती आजवर वावरणारा आईचा आत्मा त्याच वेळीं मंडपांत आला आहे, नि तो तिला आशीर्वाद देत आहे, हीच या कवितेची भूमिका. ]

" शुभमंगल ! मंगल ! सावधान ! सावधान !
बोलतें मी आई जाण !
झाला वियोग तपाचा, बाळ, भारावलें किती,
तुझ्या लीला आठवती.
होतीं कौतुक करीत किती तुझं सारी जणं,
शांतवलं माझं मन !
पण आईचा हा जीव किती झालं तरी, बाई !
आशीर्वाद आज देई.

नाही पुरतं मी न्हाऊं माखूं घातलं तूजला,
मांडी दिली निजायला !
पाठीवरूनी ग बाळ नाही हात फिरविला,
घांस नाही भरवीला !
नाही अक्षर लिहून दिलं कधी पाटीवर,
गाणं कुठलं ग तर !
नाही लाडकीला माझ्या कधी अशी वाढविली,
भाग्य नव्हतं कपाळीं !

पण रागावूं तू नको, बाळ, आजवरी काही—
उणं पडलं ग नाहीं.

तुझे काका, तुझी आजी, तुझी माई, तुझे तात—
तुला पोटीशीं घेतात !

काय करील यापरीस, ग, आई आणिक तें;
बाळ माझी माणिक तें !

जाणार तू पण, बाई, आज तुझ्या खऱ्या घरीं,
बोलायास आलें तरी.

पण बोलवेना ! काय सांगूं तुला दोन गोष्टी !
मायेपोटीं येती ओठीं !

जा जा हसऱ्या मुखानं, मागं वळून पहात,
बाळ, आपूल्या घरांत !

माझ्या मायवडिलांचे, सासूबाईमामंजींचे—
आणि तुझ्या वडिलांचे—

थोर पाठीशी ठेवीतें, बाळ, तुझ्या मी संस्कार,
रडूं नको, धीर धर.

चाल माझ्या तूं चालीनं बोल तातांच्या बोलानं,
आणि पतीच्या तोलानं !

झेल आजोळीची अंतरंगीं, बाई, भावगंगा,
तेज येईल ग अंगा !

आण गोडवा तूं संसाराला तुझ्या गोडव्यानं,
गोड होवो तुझं जिणं !

उजळाया कुळं सारीं तुला लाभेल पुण्याई,
पतिघरंची, ग बाई !

कृष्णाबाई माझी आज मिळे गडे सागराला,
कमल वा वसंताला !
विकासतां कमल हें गंध दूर दर्वळेल,
नांवलौकिक होईल !
माझा अंतरामा जाईल, ग, भरूनिया त्यानं,
जीवा मग समाधान !
ऊठ, घेई त्यांचा हात, भिऊं नको मुळीं बाई !
पाठीशीं मी आहें आई !

शुभमंगल ! मंगल ! सावधान ! सावधान !
बोलतें मी आई जाण !

१८ मे, १९३८
पुणें

## २८. पितृस्मृति !

सुनीत–शा. वि.

आलों पुण्यपुरीहुनी बहुदिसां, गांवाकडे चाललों,
    मार्गीं शांत भयाणता पसरली, ये मस्तकीं चंद्रमा;
तारा अस्फुट हासल्या, विलसली कोजागरी पौर्णिमा,
    गांवासन्निध, माळ, ओहळ किती ओलांडुनी, ठाकलों !
बोले अस्थिर चित्त आंतुन, 'कुठे जाऊं ? कुणाच्या घरीं ?
    माझें कोण इथे अता ?'–थडकल्या वेगांत लाटा अशा !
'माझें कोण बरें ! उजाड ! विभवें तीं पावलीं दुर्दशा !'
    चित्रें बालपणांतलीं सरकलीं; भारावलों अंतरीं !
वाडे उंच विशाळ ! आप्तगण वा सारे सगेसोयरे—
    होते दंग सुखांत; हाय ! नव्हतें माझें कुणी त्यांतलें ! !
भिंताडें पडकीं समोर दिसलीं ओसाड ! गेलों त्वरें !
    सारें सून्य भुताटकीपरि गृहीं एकाच त्या भासलें !

दारीं धावुन कोण वत्सलपणें आता कडी काढिल !
    कोणाचे झरतील अश्रु ! कुठलें कौतूक नेत्रांतिल !

६ ऑक्टोबर १९२७
रहिमतपूर

## २९. विसरलेला नमस्कार

सुनीत–शा. वि.

जातांना चरणावरी शिर तुझ्या ठेवीन हें योजिलें ,
आली वेळ, वियोगदु:ख मनिचें कंठामधे साठलें;
अंधारीं सरली समोरुन तुझी चारित्र्यचित्रावली,
काही आणिक थोरवी मज तुझ्याठायीं दिसूं लागली !
लोपोनी भगिनीपणा, जननिची आली तुला श्रेष्ठता,
होतों तेथ उभे तसेच, गमलें तू माय मी बालक;
आईचें कविगीत तोंच घुमलें कानीं मन:पोषक,
वाढे थोरपणा तुझा, मज दिसे, झालीस तू देवता !
ये दिव्यत्व तुला; विराजुन शिरीं तीं स्वर्गिचीं वैभवें,
दिक्काला तव दृष्टि व्यापुनि उरे; तेजें तुझीं फाकलीं;
अश्रूंनीं भिजलीं जगें, नच मना व्याप्ती तुझी कल्पवे,
झालों लीन, समाधि तोंच असल्या दृश्यामधे लागली !

होतों सान, परंतु ये तुजमुळें किंचित् मला थोरवी !
देवी, भक्त म्हणून बंधु तुजला वंदी अशा वैभवीं !

२३ ऑक्टोबर १९२२
पुणें

## ३०. आत्मनिवेदन

सुनीत-शा. वि.

तेव्हां क्षुब्ध दिशांमधून निघती निंदापमानध्वनि,
 आलीं वावटळें कितीक, उठले सैतान खाया मला !
पोटाशीं निजबंधुंना धरुनि मी चोहीकडे पाहुनी,
 गेलों गोंधळुनी, भयार्त हृदयीं अंधार कोंदाटला !
माझें साध्य, उड्या अनेकपरिच्या चित्तामधें थांबल्या,
 नि:स्वार्थी बनलों; इथेच मनिच्या आशाहि मर्यादिल्या;
प्रेमें आळविलें तुलाच हृदयीं, तूं मार्ग हा दाविला,
 गेलें दूर तमिस्र आणि पुढती मीं मार्ग चोखाळिला !
माझें चित्त पुरें मुलांत रमलें; साध्यें मनींचीं जुनीं–
 चित्ताला दिसलीं इथेच; हृदया शांती मिळूं लागली;
आलीं वावटळें पुन्हा; करकरा खाऊन दाढा कुणी–
 ओढी आंत मला, पुढे विचकुनी भेसूर दंतावली !

मृत्यूचें विषहि पिईन हरिखें मी सत्यसाध्यास्तव !
 त्याच्यावाचुन जीवनामृत नको, जेथे न शांती लव !

१२ मार्च १९२४
पुणें

## ३१. वियोगीनीचें पुण्यस्मरण !

जाति–मुद्रिका

तव मूर्ति बघूं मी कुठे मधुर हासरी । मधुर हासरी !
ऐकाया कोठुनि आता ये तुझी कंठबासरी ! ॥ धृ० ॥

किती शून्य भासतें सदज आज तुजविणें । आज तुजविणें,
खायास उठति चौबाजू हें नीरस वाटे जिणें !
सर्वत्र पसरली येथ घोर अवकळा । घोर अवकळा !
तें दीन दिसतसे सारें, ज्यांचा तुज होता लळा !

आनंद इथुन लोपला,
जों वास तुझा संपला !

तावतें ऊन ! कोठुनी सुखाच्या सरी । सुखाच्या सरी !
ऐकाया कोठुन आता ये तुझी कंठबांसरी !

गरिबींत दाट अंधार माजला घरीं । माजला घरीं,
चांदणें धवल तव लाभे दृष्टिचें हासरें परी;
पावित्र्य नांदलें थोर पूर्ण मंगले । पूर्ण मंगले !
त्या एकच रंगीं सारें संसाररूप रंगलें !

वाक्सुधा तुझी शीतळ,
हृदयास निववि कोमळ,

संसारताप शांतला तुझ्या हृत्सरीं । तुझ्या हृत्सरीं !
ऐकाया कोठुन आता ये तुझी कंठबांसरी !

अज्ञेयतरूची कळी जरा उमलली। जरा उमलली,
स्वरतरंगावली किंवा नादून जरा लोपली ?
येउनी शुक्रचांदणी जरा विलसली। जरा विलसली,
झंकृती शारदा क़िंवा पाठवी गोड आपुली ?
की भक्ति मूर्त ये घरा ?
की शांति देई आसरा ?
स्वर्गीय हास्यगीतांत डुम्बलों परी। डुम्बलों परी,
ऐकाया कोठुनि आता ये तुझी कंठबांसरी !

स्मृतिचिन्हें दिसतीं तुझी किती भोवती। किती भोवती !
प्रतिवस्तुंत मजला भासे अस्तित्व, तुझें गुणवती !
हीं बाळें प्रतिमा तुझ्या हुबेहुब, सखे। हुबेहुब सखे,
हासणें बोलणें त्यांचें किति थेट तुझ्यासारखें !
हृदयांतहि मूर्ती तुझी,
गीतिकाहि तव, नच दुजी;
पूजितों आंतबाहेर अश्रुंनीं तरी। अश्रुंनीं तरी,
ऐकाया कोठुनि आता ये तुझी कंठबांसरी !!

३० नोव्हेंबर १९२७
पुणें

## ३२. वाऱ्यामागं—!

छंद : ओवी

[ पक्षी आपल्या पिलांची काळजी त्यांच्या जन्मापूर्वीपासून वाहतात, त्यांचें प्रेमाने संगोपन करतात, त्यांना वाढवितात नि त्यांना सर्व काही शिकवितात. पण शेवटीं एक दिवस तींहि भुर्कन उडून दूर निघून जातात ! मानवी जीवनहि तसेच नाही का ? हीच या कवितेची भूमिका. ]

" कण कण मऊ माती, वाळू चोंचींत आणून,
पाया घाली घरट्याचा, सांदडींत पसरून !
धागे पिंगट काथ्यांचे, दोरे मळक्या चिंध्यांचे,
काडीकाडींतून गुंतवीले, विणून गालीचे.
गुंतवळ मिळवून ' प्रभा-माई'च्या केसांची,
बिछायत अंथरली; गादी कशास परांची ?
केलं हवेशीर घरकुल, दारं केली बंद,
कडेकोट राजवाडा- काय सांगू तो आनंद ! "

" उबविलीं कवटीं मीं मऊमऊ गादीवरी,
गेले बुलबुल माझे, चारा आणावया बाहेरी.
केली राखण, होऊन त्यांनीं कधी किल्लेदार,
चोंच भरून आणिले घास मींही कधी चार !
जोगविलं एकामेकां जीव जिवास लावून,
चोंच घालून चोंचीत, कधीं पंखांत घेऊन !
आणि बाई, एक दिनीं कवटींतून ये चोंच !
सुख लाभे जीवनाचं, शहारलं अंगीं तोंच ! "

" लिवलिवित कणिक मऊ बाळांचं या अंग;
बिलगतां उचंबळे कशानंसं अंतरंग !
कधी घेतलं पोटीशीं, चोंच घालून चोंचींत !
कधी मानेवरी मान, कधी घेऊन कुशींत !
कण कण चारीयेले आंधळयांच्या लाल मुखीं;
वाढूं लागलीं चिमणीं माझीं, बाइ, झालें सुखी ।
आणि बसून बाजूच्या नळावर, तारेवर,
थरकांपत पहारा करी, येतां पोरंथोरं ! "

" पंख फुटले नाजुक, उघडले बाई डोळे !
तेज बघूनी त्यांतलं, आईच्या मी सुखीं लोळे !
चिवाचिव, किलबिल गोड गोड भरे कानीं,
कवटळतांना मग माझा ऊर भरे मानी !
घेई पोटीशीं पाखरं, सुखीं डोळे मिटूनीया,
बुलबुल माझे बिलगती ! बाई किती माया !
निरखून गेलें, आणि कधी, पिलांस बाहेरी,
किती काळजीनं जपणूक करीती हे घरीं ! "

" आणि भरदार होतां, शिकविलं उडायाला,
ऊन-पावसांत खेळ किती सुखवी जीवाला !
कण कण मिळवून कसे टिंपून आणावे,
शिकविलं बाई, रानींवनीं घेऊनिया सर्वे !

कधी भरारून एकलींच आणीतातीं चारा,
किती वाटला जीवाला बाई, थोर माझ्या थारा !

आणि हाय– ! एक दिन वाऱ्यामागं कुठं गेलीं !
आम्ही दोघंच राहिलों—हाय ! हाय ! घरकुलीं !"

१० एप्रिल, १९४१
सोलापूर

## ३३. सुखी संसार

छंद – प्रणयप्रभा

तुझी माझी जन्माचीच जोडी !
आली संसारी अथांग गोडी ग ! ॥ ध्रु० ॥

भरदार नवतींत केला शिणगार भरून,
डोळे निवविले एकमेकां बघून,
लागुन जिवाच्या आंतल्या ओढी, ग !

आलीं वावटळें ! ऊन कडकलें !
शिणगार मोडून छायाघर केलें !
त्यागासाठींच लागून होडी, ग !

गरीबीचा थाट, समाधान दाट,
शिळी कोरडी भाकर, पाणी, मीठ !
कोरड्यास ओठाच्या ग फोडी, गं !

पोरंबाळं गुणी झाल्या हिरेखाणी;
किलबिल घरीं झालीं गोड गाणीं;
सूर आपुल्या तारांना जोडी, ग !

घाम गाळूनिया शेत पिकविलें,
मळे तरारले, घर उजविलें !
सोडवीलीं जिवाचींच कोडीं, ग !

गेलों गोड झुरून एकमेकां स्मरून;
पोराबाळांच्या गोड सपनांत विरून !
कोण आता ग आपणां तोडी ग !

**३१ मे १९४२**
**विश्रामबाग, सांगली**

## ३४. परित्यक्ता !

जाति–प्रणयप्रभा

[ दुर्वर्तनी नवऱ्यानें टाकल्यावर, प्रेमळ, कर्तव्यनिष्ठ पण जुन्या संस्कृतींत वाढलेल्या अबलेची झालेली असहाय स्थिति, ही या कवितेची भूमिका आहे. ]

किति करूं विनवणी तुज आता !
    कां कणव न ये अजुनी, नाथा ।।ध्रु०।।

वेडी होऊन येतां दारीं,
घेतलेंस तू प्रेमें पदरीं,
गृहसुख देउनि, कां कांतारीं–
    त्यजिसिं असा करुणावंता ?

घेउनि दोन्हीं चिमणी बाळें–
जाउं कुठे मी हीं लडिवाळें ?
लहर तुझी फिरतां का झालें–
    अपराधी, मी प्रिय कांता ?

कोण चंचला मानस भुलवी ?
वरकरणी मायेनें झुलवी !
संसारीं मम वीष कालवी !
    तुजविण कोण मला त्राता ?

रहा सुखानें तू तिजसंगें,
साहिन मी, मत्प्रीति न भंगे !
सेविन पाय खपूनी अंगें,
देई पीर मज सान्निधता !

नातरि राहूं दे शेजारीं,
झाडिन अंगण प्रहरीं चारीं,
सेवा करुनी राहिन दारीं,
गाईन तव पूर्विल गाथा !

रोज सकाळीं होइल दर्शन !
मावेल सख्या पोटीं हर्षन !
करी एवढें अमृतवर्षण,
बाळगळयांच्या तुज शपथा !

३१ ऑक्टोबर १९२७
अक्कलकोट

## ३५. टाकलेली !

गज्जल – वृत्त – राणी

[ दुर्वर्तनी नवऱ्याने टाकल्यावर, प्रेमळ कर्तव्यनिष्ठ पण नव्या संस्कृतींत वाढलेल्या अबलेची झालेली असहाय स्थिति, ही या कवितेची भूमिका आहे. ]

माफी मजला करा दयाळा । तोडूं मज या विवाहमाळा ।। ध्रु० ।।

साहे छळ फार आजवेरी,
सोसे न अता अनीतिचाळा !
होती तव अंतरांत गंगा,
आटे परि आज तो जिव्हाळा !
पेटे मम बाग का म्हणूं मी ?
दैवांतच यापुढे उन्हाळा !
किंवा शमवावया कहाली–
नेत्रीं मम नित्य पावसाळा !
की हा प्रणयद्रुमास माझ्या
येई वठवावया हिंवाळा !
गेला मम ताज ढासळूनी,
आता सुख कोठलें कपाळा !
प्रीती वितरून सर्व आता,
जोपासिन आपुल्याच बाळा !

अन् मी भगिनीहितार्थ आयू–
        वेचूनच शांतवीन जाळा !
सौख्यांत असा तुम्ही कुठेही,
        जातें हृदिं, दाबुनी उमाळा !

१ नोव्हेंबर १९२७
अक्कलकोट

## ३६. पाय घसरला तर –!

जाति–नृपममता

[ स्त्रीजातीसंबंधीं आदर व अनुकंपा असणें हें थोर मानवतेचें लक्षण आहे. ज्या समाजांत हे गुण नसतात तो दुर्दैवी ! इतकेंच नव्हे तर ज्या समाजांत स्त्रियांच्या बावतींत अनेक अन्याय बेपर्वाईनें केले जातात, तो नैतिकदृष्टया अधःपतितच ! या तत्त्वावर या कवितेची उभारणी केली आहे. संवादस्थळ महाबळेश्वर येथील ‘ हत्तींचें गंडस्थळ ’ ऊर्फ ‘लॉड्विक पॉइण्ट’ हें आहे. त्याच्या निमुळत्या पण भूशिराप्रमाणें प्रतापगड किल्याच्या रोखाने पुढे घुसलेल्या टोकाकडे, एका अवघड आणि अरुंद वाटेतून भाऊ व त्याची विधवा बहीण ताई हीं जात आहेत. दोन्ही बाजूंला भयंकर खोल दऱ्या असल्यामुळें भाऊनें ताईला जपून येण्यासंबंधी जी सूचना दिली, तीच या संवादास कारण झाली. ]

**भाऊ :—**

ये हळू जपूनच ताई
काळाची बघ ही खाई । बाजुला.
हा सोसाट्याचा वारा
विक्राळ भयंकर सारा । हा कडा !
ही सुळक्यावरची वाट
छे ! फिरती डोळे धीट । बघुनिहि.
सावरून—नीट ये वरुन—अशी धरधरून
बघुं नको खाली । घसरला पाय तर, खोली । ही किती !
ये इथे बसूं टोकाशीं
या शेवटल्या किरणाशीं । बोलुं या.

बघ सारी ही वनराई
एककाळची शिवशाही ! बोलकी.
या कडेकपारीखाली
अंधारी हतबल झाली । आज ती !
कां ? बोल—वाकुनी, खोल—पाहसीं ? तोल—
असा जाईल । घसरल्यावरी होईल । काय गे !

**ताई :—**

घसरल्यावरी व्हायाचें
भाऊ, या काय जिवाचें । एकल्या ?
होईल जिवाचें सोनें
सोन्याहुनि पिवळें त्याने । होइल !
मातीला मातीमोल
जाउनि हा जीव मिळेल । एकदा.
यापरी—स्वर्ग जो दुरी—तोच ही दरी
आणुनी जवळि । घेउनी उदरिं कुरवाळी । जीव हा !

**भाऊ :—**

कां असें बोलसीं ताई
बोल हा जिवाला जाई । भेदुनी !
जीव काय वरती आला
म्हणुनि काय जाणें त्याला । हें असें ?

तव जीवित मातीमोल
जाहलें कशाने बोल । या जगीं ?
लोचनीं—झर्णी अश्रुंनी—सांग येउनी
कशाला दाटी । ही केली कोणासाठीं । गे अशी ?
तुज काय, कशाचें, कसलें
जीवाच्या दृष्टिस दिसलें । पाहतां ?
स्मृति कसली झाली ताई
की दिसले ' दादा–आई ' । लोचनां ?
कंटाळा कसला आला
जीव कां जगाला विटला । यापरी ?
माहेर—जिवाचें थोर—तूच आधार
तुझ्याविण काही । या जीवा प्रियकर नाही । अंतरीं.

**ताई :—**

तुज सांगूं कोण्या वचनीं
जाळितें जिवा दिनरजनीं । आंत जें !
जन्माला आम्हां घाली
व्यर्थ का जगाचा वाली । ना कळे.
शिणभार कशाला केला
कोणाला सुखवायाला । एवढा ?
संपले—जिवाचें भलें—सार आपुलें
अम्हां संसारीं ! नुरल्यावर नातीं सारीं येथलीं !

या शिला डोंगरी फार
मजहुनी वाटती थोर । रानच्या.
साहती ताप, परि गवतें–
हीं परकीं त्यांच्या भवते । उगवतीं.
तरु, वेली कोणी कोठे
ममतेचें छत्रचि धरिते । त्यांवरी.
ठेवुनी — नित्य की मनीं —' शिला ही वनीं
प्रभूची करणी ! । ही सौंदर्याची खाणी । रानची ! '
निर्जीव जगीं ही रीत
परि अनाथास ना गोत । या जगीं !
ममतेचे तुटतां बंध
दुनियेशीं धरि संबंध । हें मन.
' आम्ही न जगाच्या; जग ही–'
परि बोलति '–अमुचें नाही । रतिभरी ! '
अश्रूंस–अश्रु देण्यास–कुणि नसे ज्यास
कशाला त्यानें । कंठणें जिणें अपमानें । भारसें !

**भाऊ :—**

बोलुं नको असलें ताई
तिळतीळ तुटतसे, पाहीं । जीव हा !
जीवाचें पाणी पाणी
होई ही करुणावाणी । ऐकतां !

काही तरि धरुनी भाव
जन्माला घाली देव । जीव हा.
बिनमोल—आयु हें फोल—जाहलें बोल
सर्वथा कैसें । दैवाच्या घावासरिसें । एक ह्या?
तुज दुर्दैवी भगिनीला
मी भाऊ बोलायाला । अश्रुंनीं–
असतांना आपण एक
स्वर्गाचें भूवर देख । राज्य हें !
तव एक अश्रुचा बिंदू
साठवील करुणासिंधु । मन्मनीं !
तुजवरी—जीव हा तरी—हृदय कां धरी
भीति जगताची । ' जग तुझें न, तू न जगाची । ' हें कसें !

**ताई :—**

हें तुझ्या धर्मसिंधूला
जा पूस रूढिबंधूला । जाउनीं.
सुखशील समाजावीण
बोलेल बोल हे कोण । लावुनी !
गळचेपी आमुचीं करणें
' धर्म धर्म ' यांत वदणें । शोभतें !
नाडुनी—सर्व बाजुंनीं—फोल ठरवुनी
जीवितें अमुचीं । अज्ञानदशा कायमची । लाविली !

अर्ध अधिक झाली माती
दुर्दैवें असल्या, जगतीं । आमुची !
धिक्कार कराया असला
वरि समाज आहे बसला । आणखी !
दुर्दैव न येथे सरलें
हाल घरींदारीं, पुढलें । भाग्य हें !
अंधार—भोंवतीं घोर—माजला थोर
किरण ते कुठले । कधि आलें, कधि तरि गेलें, सारखें !
पर्वा न कुणाला त्याची
परि निद्रा ही कायमची । लागली !
रविकिरणीं जग हें नटलें
आम्हां न अरुणकर दिसले । अजुनिही !
या किरणांवरती आशा
परि दैवी नित्य निराशा । ठेविली !
वाटतें—विश्व लोटतें—दूर, फाटतें—
हृदय शोकानें !। यापरिस ‘ जिवाचें सोनें ’ । हें बरें !

**भाऊ :—**

तो बोल न आता बोल
तुजविणें जीव राहील । काय हा ?
तुजसाठी दुनिया सारी
भिजवीन शिंपुनी वारी । नयनिंचें.

हा समाज पाहुनि लाज
वाटते आपुली आज । आपणां !
अंतरीं–आस तूं धरी–शोक आवरीं—
घसरल्यावरती । सांग मला ताई जगतीं । कोठिल ?

**ताई :—**

मजसमान अबला गाई
त्या तुझ्याच साऱ्या ताई । मग जगीं !
दे अश्रु आपुले त्यांना
त्या मुक्या करुण जीवांना । सत्वरीं !
जा, गाउनि करुणागीत
अश्रूंनीं भिजव जगांत । अंतरें !
ना तरी—वाटतें खरी-–सुखाची झरी
जिवाचें सोनें । घसरला पाय तर होणें । हें बरें ! !

**६ मार्च १९२२**
**सातारा**

## ३७. दोन पातकी

जाति–साकी

[ सारख्याच अपराधांबद्दल न्यायदान करतांना स्त्रीपुरुष हा भेद कसा केला जातो, याचें चित्र या कथेंत आहे. ही कविता सुप्रसिद्ध कवयित्री 'इला व्हीलर विलकॉक्स' हिच्या ' टू सिनर्स'चें रूपांतर आहे.' ]

१

तशीच होती सुंदर त्याची तारुण्याची कांती,
त्यांत संपदा स्वच्छंदाने खेळत होती हातीं !
शीलमंदिरा आग लावि तो मोहून रसरंगेला,
मोहरलेला पूर्णचंद्रमा झणीं कलंकित झाला !
" दिवस चार हे अशा मजेचे ! असेंच चालायाचें,
अंगांगांतुन मुसमुसलेलें यौवन जेव्हा नाचे ! "
बोलुनि ऐसें त्याच गांवचे करुन करुन शिणलेले—
करीत होते कौतुक त्याचें सभ्य कुणी पिकलेले !

आणि एक दिन अन्नाला तो पुरा पारखा झाला,
धुंदी जाउनि कृतकर्मांचा डोंगर दिसला त्याला !
पश्चात्तापें जळूं लागलें अंतर आणिक पाप,
मिळूं लागली हळूहळू मग हृदया शांति अपाप.
मुखीं शारदा नाचे; लक्ष्मी लोळण घेई पायीं,
शास्त्रीपंडित वदती– ' ऐसा थोर महात्मा नाही ! '
धनवंताने कुणी सुशीला अर्पुनि अपुली बाला,
आणि जनांनी फुलें उधळुनी, गौरविलें मग त्याला !

कुलशीलव्रती अशीच दुसरी कोणी बाला होती,
तारुण्याची कांती म्हणजे केवळ शुक्ती मोतीं ! -
पावित्र्याची, प्रेमळतेची, सहृदयतेची देवी,
तिला जगाची वरची माया ठाउक असणें केवि !
विनोदशीला, रूपमोहना, अल्लड, भोळी बाला–
प्रेमाभासें अवचित फसली शब्दशृंगाराला !
एकजिवानें, एकमनाने प्रेमें वरिलें ज्याला,
तोच महात्मा कुमारिकेचा गळा कापुनी गेला ! !

पश्चात्तापें जळलें अंतर, गळल्या अश्रूधारा !
मातापितरीं केला तिजवर दुर्वचनांचा मारा !
शास्त्रीपंडित थकले चाळुनि धर्मसिंधुचीं पानें,
धिक्काराविण धर्म न दिसला ! जनता तर अवमाने !
प्रकाश दिसला तिला न; कैसें विदुषीपण लाभावें !
मागणीस ही यावें त्यानें जनवचनीं परतावें !
असाच कोणी एक सुधारक आला, आणिक गेला !
आणि तिने मग हळूच रात्रीं आडच जवळी केला ! !

२० डिसेंबर १९२४
पुणें

## ३८. बियाणा

जाति–साकी

अपहाराला हळुच एकदा अशीच वाचा फुटली,
आणि नोकरी आधाराला होती तीही सुटली !
धडपड केली किती शिद्यानें शहरीं जगण्यासाठी,
परि भेटाया जावें त्याच्या पडे कपाळा आठी !
" जिनं आपुलं कुनब्याचं हॆं । हतं कशापै ऱ्हावं !
धरूनश्येनी कुटं बि नांगुर खेड्यांतच राबावं ! "
बोलत हें, तो बाइल-पोरें पुढे उपाशी पाही,
आणि काढुनी उसनें, रात्रीं नकळत गांवीं जाई !
असेंच घेउन मग खंडाने तिथें कुणाचें शेत,
अंतर्यामीं नवे शिद्यानें रचले पुढले बेत.

दुष्काळाचा कहर गुदरला परंतु एकाएकी,
आणि साधनासाठी दृष्टी चिंतातुर तो फेकी.
आणुन उसना नांगर त्याने शेत नवें नांगरलें,
आकाश न, पण मानस त्याचें कृष्ण ढगांनी भरलें !
" धाडस केलें अवकाळीं या ! महाग झाला दाना !
कोन आपलं हतं कुटूनी आनूं आज बियाना !
पैशाचं बी उसनं द्याया तयार न्हाई कोनी,
कशी कुनाला दावावी ही रिती आपुली गोनी !
भैऱ्या, शिवब्बा, रंगराव, त्यो वरल्या घरचा राया—! "
नांवें सरलीं अनेक पुढुनी, परंतु सारीं वाया !

घाबरलें मन, चिडलें पाहुन व्यवहारी जनरीती,
धाडस केलें भलतें, त्याची मनास वाटे भीती.
तोंच कळे कीं हरग्या अपुला ग्रामोद्धारक वीर,
येरवडयाहुन सुटून आला सत्याग्रह-शाहीर.
अमोल आहे नवा बियाणा गांठीं त्याच्या काही,
बाळपणींचा काय सौंगडी म्हणे आपणां– ' न्हाई ! '
भेटुन त्याला रसाळ गोष्टी सांगे मागिल चार,
आणि मागणी हळूच करतां, त्यास मिळे ' होकार ! '
ढग मावळले मनांतले अन् आकाशांतिल जमले,
येउन शेता नवा वाफसा, त्यांत बियाणें पडलें !

आग भडकली हबसाणीं तों नवयुद्धाची फार,
सुरू जाहला बहुमोलाने धान्याचा व्यापार.
मळणी होऊन भली थोरली होय खळ्यावर रास;
चौबाजूंनी फळास पुरती येइ शिद्याची रास.
काय सांगणें काय वाटलें येतां चौपट मोल !
निघूं लागले त्याच्या भंवतीं स्नेहस्तुतीचे बोल.
ऐकाया हें परंतु नव्हता हरग्या आपुल्या गांवीं !
हिंडलग्याला स्तुति जनतेची कैशी ही पोचावी !
आणि पसरा किती जहाला अवघ्या दो वर्षांत !
चढल्या हर्षावर हर्षाच्या लहरी उत्कर्षांत !

गळितांसाठीं शेतांतिल, तो आणि उभारी गिरणी;
मोटारींतुन शिदबा पाटिल करूं लागले फिरणीं.
अशी एकदा कामकऱ्यांना झाली माराहाण,
हरग्या धावुन दीनासाठीं टाकी जीव गहाण.
चिथावणीचा परंतु करुनी हरग्यावर आरोप,
येरवड्याला पाठविलें हें फोफवणारें रोप!
अन् घर-शेतें जप्त जाहलीं दंडवसूलीसाठी !
पदरीं घेउन तीं, शिदबांनीं घट्ट मारल्या गांठी !
आणि बियाणा ?— कसला ? पोरें महाग अन्ना झालीं !
त्याच घरावर उठली आता शिदबांचीच हवेली ! !

२५ एप्रिल, १९३७
सोलापूर

## ३९. यशस्वी कोण ?

सुनीत–शा. वि.

संसारार्णववीचि घोर उठल्या, वेगांत हेलावल्या,
कोठे तुंगगिरी, कुठे भयदरी नेत्रा जवें दाविती;
त्यांचा खाउनि मार, त्यांतच कुणी आनंद जे मानिती,
स्वत्वाला त्यजुनी गुलाम बनती जे शंख वा शिंपल्या,
ज्यांना ध्येय न, वृत्ति हीन असती ज्यांच्या सदा आंतल्या,
ज्यांना सागर झोकुनी लहरीने दे वाळवंटावरी,
ज्यांचें तेज असे विसंबुन सदा सूर्यप्रकाशावरी,
त्यांना हें यशवंत विश्व समजे, कीटांस रूढींतल्या !

त्यांचें जीवन फोल; जो परि वसे अज्ञात काही दिनीं,
तेजें साठवुनी अतुल्य बनतो जो सद्‌गुणी विक्रमी,
ज्याचें ध्येय उदात्त, सागर परी खाली जया दाबतो,
ज्याने एकच रम्य रंग वरिला बाहेरुनी, आंतुनी,
थोडासा धर लाभतां, चुरुनि जो लाटा, स्वपंथ क्रमी,
अन् सम्राटशिरीं वसे निजगुणें, मोती यशस्वान तो !

२० डिसेंबर १९२८
पुणें

## ४०. स्थानभ्रष्ट फुलास

सुनीत–शा. वि.

संध्या तांबुस रंगली, विलसली शोभा वसंतीं नवी,
राने मोहरलीं, विलासरमणी सृष्टी फुले मानवी;
चैत्रींचा मधु गौरिवृंद फिरतां शृंगारली वीथिका,
चाले तों युवती पुढे सजुनिया कोणी मनोहारिका !
बांधा नीटस, उंच; डौल तनुला, किंचित् कटी बारिक,
ल्याली चंद्रकळा, मधून पदरा ती सावरी अंजिरी;
लेणीं रम्य गळ्यांतलीं चमकलीं त्याखालुनी साजिरीं,
अंबाड्यावर मोगरा सित खुले, कृष्णांबरीं तारक !
टाकी पाऊल ती झपाझप पुढे, मी चाललों मागुन,
घाई–वायु, न वा कळे, परि पडे खाली तिचा मोगरा !
लोभे अंतर, तोंच हात वळला-थांबे–निघेना मन !
झालों दूर झणीं, क्षणीं दचकुनी, निःश्वास टाकी जरा !

जातों डावलुनी फुला, रसिक मी घेऊं कसा ? वांकुनी—
स्पर्शाया धजतां, कुणी अडविते आंतूनि, बाहेरुनी !

२३ ऑगस्ट १९२२
पुणें

## ४१. कृतज्ञता !

जाति–दिंडी

पोर खाटेवर मृत्युच्याच दारा–
कुणा गरिबाचा तळमळे बिचारा !
दूर आई राहिली कोकणांत !
सेविकेचा आधार एक हात !

ताप त्याने भरतांच तडफडावें !
पांखराने एकलें तडफडावें !
हळू गोंजारी सेविका दयाळू,
डाक्तराचें वच शांतवी कृपाळू.

कधी त्याने घ्यावें न मुळीं अन्न !
कुठे डोळे लावून बसे खिन्न !
आणि डाक्तर येतांच गोंजराया,
हाय ! लागे तो घळघळा रडाया !

एक दिन तो व्याकूळ फार झाला,
आणि त्याने पुशिलेंच डाक्तराला—
‘ अता दादा, मरणार काय मी हो ? ’
तोंच लागे अश्रुची धार वाहों !

हृदय हलुनी डोळ्यांत उभें पाणी,
तरी डाक्तरची वदे करुण वाणी;
दोन गोष्टी सांगून धीर देई,
पुन्हा गोंजारुन शांतवून जाई.

रात्र अंधारी माजली भयाण !
सोसवेना जीवास अता ताण;
हळुच बोलावी बाळ डाक्तराला;
तोहि धर्मात्मा धावुनीच आला !

अता बाळाला टोचणार तोंच,
वदे वासुनि पांखरूं दीन चोंच—
'नको आता....उपकार फार झाले !
तुम्ही....मजला किति....गोड....वागविलें !

भीत....दादा....मरणास....मुळी ना....ही !
तुम्ही....आ...ई ! '— बोलला पुढें नाही !
झणीं डोळे फिरविले बाळकाने !
आणि पुशिलीं लोचनें डाक्तराने ! !

१५ सप्टेंबर १९२५
पुणें

## ४२. देवि क्षमे !

सुनीत

स्वार्थी ठेवुनि घोर दृष्टि अपुल्या सद्‌बुद्धिला जाळुनी—
दुष्कर्मांत मजेंत जे निशिदिनीं संतोषुनी रातले,
त्यांना निष्ठुर संकटांत जग जों मारावया मातलें,
तच्चित्ता अनुताप तूं घडविला ! पापानलीं पोळुनी—
झाले तेहि विशुद्ध; पाजुनि सुधा देवी तुवां हासुनी,
औदार्यें जननीपरी निजकरीं सानंद कुर्वाळिलें;
हृद्वेदीवरती पवित्र जळ तूं ऐसें सदा शिंपिलें,
झालें पाप अपाप सर्व, तरले अन्यासही तारुनी !

वाटे विस्मय हा परंतु मज कीं, जे घोर याहून ही,
ज्यांना स्वार्थ न वा परार्थ, छळिती अन्यास निष्कारण,
पश्चात्ताप जयां कधीं न शिवतो, जे लाजवीती खला,
ज्यांना नीति न दंडिते, रडतसे ज्यांच्यामुळें ही मही,
त्यांना देउनि कां सुधा न करिसीं दुष्टत्व-निर्मूलन ?
जें झाल्यावर दिव्यलोकसमता येईल या भूमिला !

२४ एप्रिल १९२४
पुणें

## ४३. सुंदर हिरवे माळ !

जाति—कोकिळा

[ सपाट प्रदेशावरील, उन्हाळ्यांत धूसर दिसणाऱ्या माळाचें खरें सौंदर्य वर्षाकालाच्या सरींनी बहराला येतें; त्यांतच डोंगर व सुखी शेतकरी पहाण्यासाठीं मन आसावतें, हीच या कवितेची भूमिका. ]

सुंदर हिरवे माळ ! चहुकडे सुंदर हिरवे माळ ! ॥ ध्रु० ॥

जमली काळी वर घनमाला,
झिम् झिम् पाउस खाली आला,
ग्रीष्मर्तूचा ताप निवाला,
कोंभ येउनी दूर दूरवर पालवलें खडकाळ !

बोरवनाचीं सुकलीं पानें,
तरतरलीं या नवजलपानें,
विरळ बाभळी चैतन्याने,
स्वानंदाने डुलूं लागल्या सकाळ, सायंकाळ !

सुकलीं गवतें गोट्यांखालुन—
हिरवळुनी बघतीं डोकावुन,
रसरसलेल्या तेजें न्हाउन—
मराठमोळा तरुण कुमारी लाजति की लाडिवाळ !

समोर इकडे तिकडे भवती—
हलूं लागली हिरवी नवती,
ओलसरीने पानें दवती,
माळावरल्या वनराणीला नजराणाच सुढाळ !

*

सुकल्या ओढ्यांतुन ही खळखळ—
मुरमाडांतुन करी धांवपळ,
गीतमोहिनी घालुन मंजुळ,
हळुच नर्तनीं रुमझुमवी ही पायांमधले चाळ?

जोगवलेलीं गुरें कुणाचीं—
दूरावरुनी जात सांजचीं—
अडवित तेजें मावळतीचीं?
काळ्या छाया सरती एकामागुन एक विशाळ!

क्षितिजीं निळसर वाफाऱ्यांचे——
तरंगती ढग नव रंगांचे;
शिखर न कोठे सह्याद्रीचें,
मात्र एकला जवळ उभा हा ऐटिंत राजमहाल!

निवलीं रानें गुरें-वासरें;
निवलीं झाडें रानपांखरें;
धनी अंतरीं निवले सारे;
शेतकऱ्यांच्या पोटामधला निवेल कधिं पण जाळ?

२६ जुलै, १९३३
फलटण

*

## ४४. वारेपाऊस

जाति – कोकिळा

[ वादळांतून जो पाऊस निर्माण होतो तोच वारेपाऊस. तिसरे प्रहरीं वादळ झालें, पाऊस पडून गेला व ऊन पडलें म्हणजे सृष्टी कशी दिसते व असल्या वळवांनीं शेतकऱ्यांना किती आनंद होतो, हीच या कवितेची भूमिका. ]

वारेपाउसगान गाउं या । वारेंपाउसगान
गड्यांनो, वारेंपाउसगान ।। ध्रु० ।।
सूर्य उतरला मावळतीला,
संध्यावदनीं रंग बहरला,
राईवरती हीं पूर्वेला–
किरणें हसरीं गोड नाचुनी, झुळझुळ डोले रान !
गडयांनो, झुळझुळ डोले रान !
सोसाट्याने तोंच भरारा,
पूर्वेकडला वाहुन वारा,
पर्जन्याचा पिटवि नगारा,
वारेवादळ सभोवतालीं घाली मग थैमान !
गडयांनो, घाली मग थैमान !
सळसळ पानें गोळा झालीं,
पाचोळ्यांचीं हीं वेटाळीं,
गिरकी घेती वरतीं खालीं,
फिरकत येई धूळ पुढे ही, गिरगिरुनी बेभान !
गडयांनो, गिरगिरुनी बेभान !

सर सर सर तों काळे धूसर—
पूर्वेला ढग आकाशावर—
चढूं लागले व्यापुन डोंगर,
की देवांचीं वरून सुटलीं दिव्य विमानें छान !
गड्यांनो दिव्य विमानें छान !

मागे उतरे पाऊसफळी,
दों बाजूला या वावटळी,
मधेंच खुलती अंब्रेओळी,
सोनेरी चांदणें तयांवर हसतें पानोपान !
गड्यांनो, हसतें पानोपान !

क्षणांत झालें सर्वच धूसर,
काळवंडलें वरलें अंबर,
दूर सांडलें धारांचे सर;
गार हवेंतुन ये मातीचा सुगंध, भिजतां रान !
गड्यांनो, सुगंध भिजतां रान !

खाली हर्षे मोर नाचती,
ढवळे बगळे हवेंत फिरती,
पाऊसकिडे वर भिराभिरती,
किंवा फिरतीं नवीं भविष्यें गरिबांचीं बलवान !
गड्यांनों, गरिबांची बलवान !

गडगडाट तों झाला गगनीं,
तडिल्लतेची रेषा चमकुनि—
नर्तन करिते मधुनी मधुनी,
इंद्रधनूची सुंदर विलसे धारेवराति कमान !
गड्यांनो, धारेवराति कमान !
थेंब टपोरे तों टपटपले,
धारासारीं मेघ ओतले,
वाऱ्यानें बेफाम जाहले,
दंगल उठली, ओढे गाती खळखळुनी रणगान !
गड्यांनो, खळखळुनी रणगान !
डिखळें जागोजागीं विरुनी,
पाणी वाहे शेतांमधुनी,
पाहुनि वैभव हें, कोपींतुनि—
घुमवूं गाणें आनंदाने निवतां पंचप्राण !
गड्यांनो, निवतां पंचप्राण !
अंधारुन जग आलें भवतीं,
गडी सांजचे घरास निघती,
खड्या सुराने कुणि आलापिति !
त्या गाण्यावर गुंगत जाऊं आपण मारुन तान !
गड्यांनो, आपण मारुन तान !

२३ मे १९२६
रहिमतपूर

## ४५. भलरी !

छंद

भलंऽर, भलंऽर
भलंरि दादा ! भल गडि दादा ! ।। ध्रु० ।।

तांबडं फुटलं झुंजूमुंजूं,
सुकीर चांदनि लागली झूं,
थंड वात करतुया कुजूंबुजूं,
म्होरं हात चालिव जोसांत मर्दा !
भलंरि दादा ! भल गडि दादा !

कापुरवड्याचं झुळझुळ पानी,
पांखरासंगं गाउन्‌इयानी—
रंजाविल गडया खेळियावानी,
न्हिरीचा खाउन चल भाकर कांदा !
भलंरि दादा ! भल गडि दादा !

बाच्या फिरतीची सुमरून आन,
लुटायला जावूं मोत्याची खान,
उपटुन काडूं कणसाळलं रान,
चला राव भिडवुन खांद्यास खांदा !
भलंरि दादा ! भल गडि दादा !

शिवारिं जित्राप नागावानी,
सळ्सळ् जावाज, डुलती फनी,
डुइवर धरल मोत्याच मनी,
कवळुन आनुं या वर्साचा सौदा !
भलंरि दादा ! भल गाडि दादा !

कडूसा पडतां संपल पाळी,
ढवळी व्हईल मोकळी काळी,
इर्जीकीला मिळंल नळी,
काळ्या रातीला फुलविल चांदा !
भलंरि दादा ! भल गाडि दादा !

इरब्राळ ठिपकाल डुईचं पानी,
शिगंल खळं डोंगरावानी,
भरत्याल् कनगी गंजी, रानीं !
खात्याल समदी प्वाटभर मलिदा !
भलंरि दादा ! भल गडि दादा !

१४ नोव्हेंबर १९३४
फलटण

## ४६. दौल्याची दिवाळी !

जाति–दयिता

[ दुष्काळाची भीति वाटणाऱ्या दौल्याने आपली दिवाळी सुखांत साजरी करण्यासारखें काय घडलें, ही या कवितेची भूमिका. ]

कोण उभा हा शाळुमधे, वरती लावुन दृष्टी,
गुडघाभर जग भवतींचें, पाहुन होई कष्टी !
मुंडासें—मळक्या चिंध्या झिळमिळ डोईवरती,
दावि फाटकी पैरण ही पोटभकाळी पुरती !
किती ठिगळलें धोतर हें गाठुन ठायीं ठायीं,
खालुन काळीचे चटके हाय ! न काही पायीं !
येइ अरेरे ! कष्टदशा सकस हाडपेरांना !
काळवंडलें तोंड किती मलूल पाहुनि राना !

डोक्यावर तावुनि गेलें भर बाराचें ऊन !
रानीं तरि खपुनी दौल्या तण काढी खुरपून.
झुंझुरकाची खाऊनी कांदा भाकर मिरची,
आग शमवि तो पोटाची न्याहारी गरिबीची !
भांगलतांना आणि पुन्हा आग पेटली पोटीं,
खरडुनि हेळामधिं नरटी, लावी दौल्या ओठीं.
आग भडकली आकाशीं जाळ लोटले खालीं,
‘ करपे शाळू ’ बघुनि भरे हृदयीं डोंबकहाली !

“ कुठला दसरा अन् कुठली आता घरीं दिवाळी !
राजापरदान्याला अन् आग अमां ही जाळी !

कारबारिनीला कुटलीं    कांबुरनं मी घ्येवूं ?
पोराबाळांना उगडं    वरिसभरी का पाहूं !
सावकार अन् त्यें सरकार्    कुटली त्येना माया !
लिलावास काडितील त्ये    भांडीं, मडकीं, गाया !"
पाणी पाणी जीवाचें    तों भीतीनें झालें,
अंगांगांतुन घामाचे    लोट निथळुनी आले,
थांबुन दौल्या आणि जरा    पुन्हा शिवार न्यहाळी,
भविष्य दिसलें कीं त्याला ?    पुन्हा आंसवें गाळी ! !

तो धूसरुनी आकाशीं    जमले काळे मेघ,
गार हवेंतुन मातीचा    येई गंध सवेग.
तिरिप नभींची काजळली,    ढगाळली अन् छाया;
धो धो हस्ताची वरसे    खाली ओली माया;
लागे दौल्या नाचाया    आनंदानें भिजुनी,
लक्तऱ्यांतुनी ओघळल्या    वरल्या धारा अजुनी !
कार्भारिण तों शेवती    घेउनि येइ शिदोरी,
नाचत दौलतरावांची    झटकन धावे स्वारी.
घेउन तिज मग सांगातीं    जरा ओढुनी जवळी,
घास मुखीं देऊन वदे—    "आता गडणि, दिवाळी !"

२ ऑक्टोबर, १९४०
विश्रामबाग, सांगली

## ४७. धुक्यांत !

सुनीत– शा. वि.

रानें डोंगर, भोवती हिरवळी, ओहोळ उंचावरी,
झाडी दाट, कडे भयाण मधुनी रेखीव रस्ता असे;
काळे मेघ नभीं, दऱ्यांमधि धुकें, येतां वरोनी सरी–
गेलें अंग भिजून; पूर हृदयानंदास तों येतसे.
आल्या तोंच चळा, सरीवर सरी, वाफा तयांच्या किती–
कंगोऱ्यावरुनी सुसाट पळती वाऱ्यासवें सुंदर;
पायीं छुमझुमवीत नूपुर वरी कीं अप्सरा धावती,
दाटे शुभ्र धुकें; क्षणांत उरलों मी अन् पयःसागर !
वृत्ती तों स्थिरल्या गभीर बघुनी खालीवरी शुभ्रता,
"खेळे कोण असें ? कुणास्तव बरें तें विश्व चेतोहर ?
येथे कोण धनी ? कुणास्तव असे गंभीर ही दिव्यता ?"
बोलें आणिक दृष्टि आंत वळवी शोधावया अंतर.

माझें तेज मला विराट दिसलें ! सृष्टी पुन्हा हासली,
चैतन्येंच नसानसांत तिचिया माझीं मला भासलीं !

३१ जुलै १९२३
पुणें

## ४८. शांतिस्थान !

जाति–कोकिळा

[ संसारतापानें तापलेल्याला विश्रांतिस्थान हें पाहिजेच असतें. त्यांतल्या त्यांत निसर्गाचीं शांत व सुंदर एकांत स्थळें मन लवकर निववितात. माझ्या गांवच्या अशाच एका स्थलाला उद्देशून ही कविता लिहिलेली आहे. ]

एकच शांतिस्थान मला तूं। एकच शांतिस्थान ! ॥ध्रु०॥
रानें भवताली हिरवळलीं
शेतें गंधानें दरवळलीं,
जळें ओहळांतुन खळखळलीं,
विंझणवारे वंशतरूंतुन गाती मंजुळ गान !

खडक बाजुला विशाळ सुंदर,
खाली ओबडधोबड फत्तर,
कपारींत हीं झुडपें वरवर,
शुभ्र, लाल या तटीं कण्हेरीं डुलती लववुनि मान !

गवतुन गेल्या काळया डगरी,
एक झोपडी ही उंचावरि,
पलीकडे त्या, माझी नगरी,
फुले फुलोरा, मीच फुलारी हा माझा अभिमान !

उत्तरेस डोंगर चंद्रागिरि,
समोर पूर्वेला अंभेरी,
दक्षिण पसरे ही दूरवरी,
पश्चिमझाडीमधून दिसती शुभ्र घुमट हे छान !

पलीकडे, कृष्णा खोऱ्यांतुन—
आजिंक्यताऱ्याच्या शेजारुन—
मुरडत जाते वळसा घेऊन,
अंतर्लोचन इथून बघती प्रदेश पुढले सान !

नील क्षितिजीं अंधुक टोकें—
किरणानें चमकतीं हीरकें,
सह्याद्रीचीं निळसर नाकें,
मूर्तिमंत मज इतिहासाचें दिसतें पुढती पान !

उंच जरंडा शाळुंकेसम,
धर्मध्वज फडकवितो अनुपम,
जवळुन खालुन रस्ता प्रियतम—
प्रियमित्राच्या गांवा जाई वळुनी रानोरान !

दृष्टी सौंदर्याने भरते,
जीवनकलहाशा मग मरते,
दिव्यांतुन अंतर गिरगिरतें !
एकांतीं या जरा बैसतां नुरे जिवाचें भान !

संसारांतिल भेसुर चिंता—
जाळिति अंतर जातां येतां !
इथेच पावे मन तन्मयता !
स्वर्ग आमुच्या तू नगरीचा, केवळ तू मत्प्राण !

सन्मार्गानें कष्ट करूनी,
भलीं बुरीं वा वचनें ऐकुनि,
अल्पपणें भूमाता सेवुनि,
एक दिनीं तरि जग विसरावें होउनिया रममाण !

आजवरी जीं लिहिलीं गाणीं—
यावें येथे तींच घेउनी,
ओहळासवें सूर धरूनी,
श्रोतागायक मीच होउनी एकच ध्यावें ध्यान !

**२५ ऑक्टोबर, १९२३**
**रहिमतपूर**

## ४९. स्मृतिस्थळ !

जाति–भूपतीवैभव

[ पूर्ववयांत आपण एखाद्या स्थळीं भावी आयुष्याचे किल्ले उभारावेत व दुर्दैवाच्या एकाच फटकाऱ्याने ते पार ढासळून जाऊन, आपणांस इतरत्र कुठे तरी आयुष्य कंठण्याचा प्रसंग यावा आणि कालांतराने पुन्हा त्याच स्थळास भेट देण्याचा आपणांस योग यावा, अशा मनस्थितींत आपणांस काय वाटतें, ही या कवितेची भूमिका आहे. ]

येथेच गाइलीं असतीं आपण गाणीं,
ऊर्जस्वल भरुनी स्फूर्ती रानोरानीं ! ॥ धृ० ॥

लाभली जिवाला येथे प्रेमळ जोड,
लागले निघाया संवादी स्वर गोड,
तरळली पुढे मधुसृष्टी, लावुन ओढ,
परि कशी निमाली मोहनसुंदर वाणी !

म्हटलें कीं आपण फुलवूं येथिल गवतें,
जोमांत भरूं सौंदर्य नवें लवथवतें,
लागेल चराचर नाचायाला भवते,
कां एकाएकी शिशिर विकळता आणी !

म्हटलेंस मला चंडोला, मार भरारी–
फेकून लकेरी जीवा मोहविणारी,
घेतांच तान वर्षली स्मितें सोनेरी !
घायाळ कुणी का तोंच करावें बाणीं !

ओसाडित तेव्हा स्फुरले मंजुळ सूर,
सौंदर्यहि इथलें आज गमे भेसूर !
अज्ञातपणींही लाभे मधु दुर्धर !
कीर्तीने होई हृदयीं आज निशाणी !

ही फुलली सृष्टी परि वाटेच उदास,
हा शीतळ वायू वाढवि ऊष्णश्वास !
वाढविती पोटीं आग पूर्वीचे भास !
का जन्मभरीं ही गाणें एक कहाणी !

७ नोव्हेंबर १९३१
बुधगांव–फलटण

## ५०. आकाशलिंब

सुनीत–शा. वि.

जातां श्रावण वर्षुनी, उमळला भावार्थ अभ्यंतरीं,
पानें दाट कळ्या फुलें डंवरलीं हीं लांब तूझ्यावरी;
जाशी लागुन ओढ उंच वरती, होऊन आकर्षण,
आकाशांतुन होतसे मग कधी तूझ्यावरी वर्षण.
दारीं होय सडा मनोहर किती हा दाट ताऱ्यांपरी,
बाळें हास्यमुखी सुदंत अथवा हंसावली साजिरी,
किंवा लेवुनि वेश शुभ्र युवती नाचावया अंगणीं—
आल्या थेट वरून फेर धरुनी, अन् श्रांतल्या रंगणीं !
जाई कल्पतरु मनांतिल असा माझ्या कधी अंबरीं,
होई त्यावर शिंपणें वरतुनी आसावतां अंतरीं;
येती दाटुन भाव आणि कलिका हासावया लागुनी,
पुष्पें सुंदर त्यावरी लकटतीं, दारीं सडा होउनी !

वेंचूनी तव हीं फुलें, प्रभुवरा पूजी कुणी भाविक;
कामीं येतिल का मदीय, म्हणुनी मी होय पर्युत्सुक !

२१ सप्टेंबर १९३३
फलटण

## ५१. मानसमेघ !

वृत्त–सुमंदारमाला

[ नैनिताल येथील 'चायना पीक' टोकावरून दूरवर दृष्टि फेकली असतां, मानस, नंदादेवी आदिकरून उंच शिखरें दिसतात. त्यांच्यावरून ढग जाऊं लागले कीं सूर्य किरणांनीं त्याची शोभा वाढते. समोर ही शुभ्र-सुंदर शोभा पहातांना व आपण परतंत्र मायभूमीच्या एका टोकाला आलेले आहों, ही जाणीव होत असतांना काय वाटतें, याचेंच भावचित्र खालील कवितेंत आहे. ]

तुझी शुभ्र उत्तुंग शैलाग्रमाला
नभीं शोभते ही हिमानें किती !
किती दूर विस्तार हा पांगलेला
निळापांढरा सिंधु वा भोवतीं !
अनंतावधी उंच लाटा नगांच्या
उधाणून की नाचती भूवरी ?
जलक्रीडना पातलेली गजांची
नवी झुंड वा पोहते अंतरीं ?
किती देवदारू उभारून शिर्षे
तुझीं वैभवें पाहती तिष्ठुनी !
उड्या झोत घेती तुला भेटण्याला
प्रपातींच जाती परी गोठुनी !
निवाऱ्यास बैसून शोभा तुझी ही
डहाळ्यांतुनी पाहतीं पांखरें !
नभांतून येऊन ही रश्मिमाला
कशी नाचते सप्तरंगीं त्वरें !

चकाकून बर्फाळलीं उंच टोकें
किती दाविती व्योमरंगावली !
तुझें टोंक वेटाळुनी मेघमाला
महासिंधुफेसापरी चालली;
किती शोभती हे नभःकार्मुकाचे
महामानसा ! रंग तुझ्यावरी !
तुझा ' आंतरः कोऽपि हेतुः ' स्वभावें
उमाळून येई असा वा वरी !
असे वोपिला यक्षसंदेश, त्याचे
मनोराग हे कोवळे सांडले ?
प्रभावी उमेच्या तपाचें असें वा
गिरीशापुढें तेज वोसंडलें ?
असे दृष्टिची फेक वा ऊर्वशीची
पुरूदर्शनीं वेधुनी राहिली ?
तपस्वी तरंगून वा हंसचित्तें
अशीं मोक्षमार्गास की लागलीं ?
मनोहारिणी मेघमाल्या निघाल्या
कुठे उंच संचारुनी रंगुनी ?
तपस्वी शुका ! चाळवाया तुला की
सुवर्णांग आल्या कुणी कंचनी ?
तुझें बोधिसत्त्वा ! हरायास आल्या
कुणीं सत्त्व वा राजदेवांगना;

पराभूत होऊन वेगें निघाल्या
घरा आपुल्या लाजुनी मोहना ?
" स्वतंत्र ध्वजा नाचुनी अंतराळीं
स्वराष्ट्रास देतीं नवीं वैभवें !—"
वरी मान उंचावतांना तुला की
दिसे दृश्य हें भोंवतालीं नवें ?
तुझ्या अंतरीं आग पेटून, वाढे
तुझें आंतल्या आंत अंगारणें ?
ज्वलद्भाव अन् हे उफाळून येती
वरी मेघरूपें, कराया रणें ?
हिमानें तुझी कोंदली आंत वाणी
वदायास येई न कांहीं, कुठे,
स्फुरद्वैखरी मूकभाषी, म्हणूनी
तुझ्या आज कंठांतुनी ही फुटे ?
कधी तापुनी गर्जती गूज सारें
तुझे बोलके, सांग, चिंतामणी ?
नव्या हिंदवी वैभवाची श्रवू दे
तुझी, मानदंडा ! मला अग्रणी !

**१० नोव्हेंबर, १९३९**
**नैनिताल**

## ५२. क्षणाचाच विलंब !!

जाति-दिंडी

शिरीं धोंडा लागून जखम झाली,
आणि फांदीवरुनि ती पडे खाली !
तिचा जिवलग धावला सावराया ,
तीहि तडफडुनी लागली उठाया !

जवळ कोठे त्याला न दिसे पाणी,
आंत ओढूं लागली तिची वाणी !
थेंब आणाया जळाचा कुठून,
जरा कष्टाने—जाय तो उडून !

एकली ती, पाहून भोवताली—
हळू चिवचिवली, व्याकळून गेली !
कंठ पाण्याविण शोपुनीच गेला !
त्यांत अंतर्वैरीच सखा झाला !

चोंच वासुन, ताटले पंख पाय,
आणि अस्ताला सूर्यबिंब जाय !
तोंच घेउन चोंचींत जळें येइ—
तिनें त्याला परि पाहिलें हि नाही !!

२० मार्च १९२४
पुणें

## ५३. श्रीशारदावंदन

वृत्त-मंदारमाला

छाया तरूंच्या किती रंगलेल्या तुझ्या भोवती थाटुनी राहती !
स्वर्गांतुनी पाझरे तेज खाली, फुलें पर्णराजी, तृणें नाहतीं;
तीरीं शिळेच्यावरी भव्य मूर्ती तुझी शुभ्रवस्त्रांकिता हासते,
वीणा मृदु स्पर्शने छेडुनी ही तरंगावली अंगुली निर्मिते !

देवी ! तुझ्या दिव्य आलोकनाची शरच्चंद्रिका त्यावरी नाचते,
चैतन्य संचारुनी अंतरंगीं जडांना तुझी दिव्यता लाभते;
नाचे तुझ्या गोड झंकारगानावरी ताल देऊन मंदाकिनी,
नाचे तरंगांतुनी गुंगलेली मुदें खालती मंद कल्लोलिनी !

वायू तुझ्या मंजु गुंजारवाने इथे मोहुनी सारखा थांबतो,
कादंबिनीखंड हा अंतराळीं तुझ्या प्रेरणेनेच आंदोलतो;
ध्यानस्त झालें तुझ्या आदिरूपामधें विश्व हें गायनीं डोलुनी,
संसारदुःखामध्ये पोळलेले इथे बैसती अंतरें खोलुनी !

ओवी-अभंगाजलि-श्लोक-आर्यामुखांनी तुला आळवीलें कुणीं,
माते ! कृपावृष्टि केलीस त्यांच्या मनोभूवरी आर्तगी ऐकुनी;
मी दीन, मी लीन तेथे कशाला बरें अल्पधीने उभें राहणें?—
ध्यावें तुझें ध्यान येथून, आई ! इथूनी तुला भक्तिने वंदणें.

जीवा हवें तें कुठे सापडेना, म्हणूनी तुझ्या रंगलों चिंतनीं,
माते ! मनःशांततेची सुधा या जिवा पाजवी गीतगंगेंतुनी;
निःस्वार्थतेने तुझे शब्दबिंदू असे साठवूनी सदा अंतरीं,
सोडीन एके दिनीं कांचनाची जटेंतून गंगा गिरीशापरी !

१४ फेब्रुवारी १९२५
पुणें

## ५४. कवितेचा जन्म

सुनीत–शा. वि.

दृश्यें सुंदर हीं अनंत दिसतीं, वाटे धरूं कोणचीं !
अंतरलोंचन पाहती टकमका; व्यामोहते भावना !
काही अस्फुट धावती द्रुतगती आकाशिच्या कल्पना,
ये आंतून उचंबळून, धरतां जातीं किती हातचीं !
काही रंग सुरेख इंद्रधनुचे वा पाचुची पालवी,
सूर्याचे कर चंड वा शशिकला केव्हा सुधावर्षिणी;
केव्हा कोमल भाव, नाजुक मनें प्रेमांतराकर्षिणी,
केव्हा भेसुर रुद्रता, कुणि तरी ऐसें जिवा हालवी.
गाई अस्फुट गीत मंजुळ कुणी तों आंत वीणेसवें,
कोणी कुंचलिने चितारित बसे रंगामधें अंबर,
फेसाळून खळाळ गर्जुनि हृदीं हेलावतो सागर,
चित्तीं गोंधळ होउनी क्षण मला ना हालवे, बोलवे !

देवी, एकवटून वृत्ति विरुनी लागे समाधी जरा,
होतां वृष्टि सुधामयी तव, वदे सानंद काही गिरा !

९ जुलै १९२३
पुणें

## ५५. सुनीत

सुनीत–शा. वि.

जीवाची रमणयिता हरपली मुंताज जीवेश्वरी !
हेलावून शहाजहानहृदय व्याकूळ होई किती !
सौंदर्यप्रतिमा मनोहर तिची जी साठली अंतरीं,
प्रेमें रत्नमणीहिऱ्यांत उभवी ती ताजरूपी स्मृति !
हाले दिव्य कणाकणांतुन तिथे त्याची मनोभावना,
सौंदर्यें दिसतीं सजून अजुनी मुम्ताजतेजापरी !
नाना अस्फुट शिल्पकारमनिच्या सामावल्या कल्पना,
झाला ताजमहाल एकच जगीं; तो तोच त्याच्यापरी !
होतें व्याकुळ चित्त आणि लहरी हेलावती अंतरीं,
अंतश्चक्षुंस जेधवा नव जगीं सौंदर्य किंवा दिसे,
आम्ही होउन शिल्पकार अमुचे, ओतून कारागिरी,
शब्दीं ताज नवे नवे उठवितों – हे कल्पनांचे ठसे !

तूतें 'ताज' म्हणून एक उपमा वाटे सुनीता, भली,
आहे सर्व जयांत, दिव्य परि ज्या कारागिरी लाभली !

२३ मे १९२३
रहिमतपूर

## ५६. लक्ष्मीपूजनाच्या सायंकाळीं

सुनीत—शा. वि.

राहे एक तमिस्र पूर्ण भरुनी, अंधारतां भोवती,
नेत्रा कातळ ही दिसे न; हृदयीं खिन्नत्व आलें असे;
खालीं मात्र पुरींत दीप, वरती तारा नभीं हासती!
गेली लोपुन अन्य सृष्टि! नयना भव्यत्व काहीं दिसे!
अंधारांतुन बाण तों सरसरा आले वरी नाचत,
एकामागुन एक सर्व भवती नाचूं उडूं लागती;
कारंजीं जणु अग्निचीं उडविलीं, वा कल्पना धावत—
घेती पेट उचंबळून कविच्या, कीं जीव उंचावती?
आकांक्षा मनिंच्या जळून जग वा जाळावया धावती,
येती सर्व विझून कृष्णमुख ते खालीं पडाया झणीं;
जीवांनीं कलहानलीं क्षणभरीं चेतून ऐशी गती—
घ्यावी, यापरतें न साध्य कसलें आम्हांस कालेक्षणीं!

काव्याच्या तरि गर्व कां मग मनीं हा आपुल्या वाहणें!
आम्ही पेटुन बोललों क्षण, तरी कालें जिथे रक्षणें!

१० नोव्हेंबर १९२३
पुणें

## ५७. सारंगीवाला

जाति—मनमोहन

[ एक सारंगीवाला याचक, रात्रीं निजानीज झाल्यावर, रस्त्याने अंधारांतून एकटाच सारंगी वाजवीत चालला असतां, शांत हवेंतून येणारे त्याच्या सारंगीचे भावमधुर सूर ऐकून काय वाटलें, हें कवितेंत चित्रित केलें आहे. ]

मनमोहन वाजवुनी सारंगी काढी मंजुळ सूर ॥ ध्रु० ॥

विश्व निजलें, शांत झालें,
एक धरणी मात्र डोले,
गंभीरपणाने अंधारांतुन छेडित जाई सूर !

कंप वाऱ्यांतून कानीं—
तरल येती गोड गानीं,
समरसती हृदयीं भाव, लागते गोड मना हुरहूर !

नाचती हे वरति तारे,
गात डुलती मंद वारे,
बघ तालावरती नाचूं लागे हृदय, वाहुनी पूर !

अंगुलीची रागदारी—
आंत उठते गुंजणारी,
मग एकतान होऊन ऐकितें आंतुन कुणि आतूर !

जीव डोले दिव्यतेने,
रोमरंध्रीं भरूनि गाणें,
मन तन्मय होउनि मधुर माधुरी सेवित झालें चूर !

रस, कला या एकवटुनी,
बोलती की झंकृतींनी,
सौंदर्य नाचतें थय्‌थय्‌, वाजति शब्दांचे नुपूर !

काय कसलें गान गावें !
शांत चित्तें व्याकुळावें !
तळमळुनी त्यांतच शोधित जावें वाटे पुढती दूर !

म्हणुनि वरुनी येथ येसी,
सूर गंधर्वांच घेसी,
शांतवी लकेरी तप्त जिवा, तरि छेड छेड ते सूर !

१३ जानेवारी १९२४
पुणें

## ५८. सूरसंगिनी

जाति–अवनी

[ कलावतीचें नितांतमधुर शुद्ध रागदारीचें गाणें ऐकल्यावर— ]

लावि जिवा वेड तुझी गोड गानबांसरी,
सूरसंगिनी, लकेर फेक पुन्हा हासरी ! ॥ ध्रु० ॥

तव गानीं तरलमधुर,
मंजुळलें नीलांबर,
सर्वांतुन एक लहर–
येई वेधणारी !

वीणेची तरल झार,
सारंगी मधुर फार,
तींत मिळे हृदयतार,
गोड रागदारी !

स्पर्शुनि हलकेंच सूर,
लहरींचें स्वप्न मधुर,
जायातें तरुन दूर–
निर्मिसीं विकारी !

स्वरमय कीं हें विमान,
सोडिसिं, फेकून तान ?
जीव गात गात गान—
मारितो भरारी !

विश्वांतिल सुंदरता—
दावी स्वरसंगमता,
रमवी हृदयंगमता—
जीव मोहणारी !

शांतिपूर तव लहरी—
भरती मम हृत्कुहरीं,
स्वप्नसंगि दृक् तिमिरीं—
होय पाहणारी !

२१ जून १९२८
पुणें

## ५९. सप्तर्षि

सुनीत–शा. वि.

शुक्राची नव हेमकांति खुलते अस्ताचलीं मोहक,
विद्युद्दीप कितीतरी पटपटा हे लागती अंबरीं;
नाचे हें मृग मस्तकीं, यमपथीं शोभे अगस्ती, परी–
माझी दृष्टि तुझ्यावरीच, न कळे, कां लोभुनी थांबते !
जेव्हा तूं गगनांत हासत असा सायंतनीं नाचसीं,
मध्यान्हीस कधीं प्रभातसमयीं ये पुंज किंवा वरी,
चक्राकार गति ध्रुवाभवतिची ऐशी तुझी पाहुनी,
माझें चित्त रमे भुलून, हृदया मैत्री तुझी मोहवी !
मैत्री अंतरिची अम्हांतिल, तुला न्याहाळितां कौतुकें,
आम्ही आठ तुझ्यापरी म्हणुनिया, लागे तुळाया तुशीं,
आम्ही आठ मिळून फेर धरतों ध्येयासभोतीं असे,
ऐसें आंतर हेतु, साम्य बघुनी, चित्तास आकर्षिती !

होवो साम्य खरें न वा; परि अम्हां तूझ्यापरी निश्चळ—
विश्वीं जें ध्रुव तेंच लाभुन, मिळो सौंदर्यजीवी बळ !

९ एप्रिल १९२४
पुणें

## ६०. गुरुदेव रवींद्र !

जाति – मंजरी

तुज फुलाफुलांतुन सुगंध नव लाभले,
त्यांतून पीक तूं नदितीरीं पिकविलें,
‘ सोनेरी नौकेंतून ’ धरेला दिलें.

तू निर्झर–ओढे–महोदधींतिल जल—
निज मंत्रोच्चारें तीर्थ करुनि मंगल,
शमविलें धरेला, होतां ती व्याकुल.

तुज कोमल किरणें सोनेरीं गवसलीं,
मृदु हातें त्यांची विणुनी वसनावली,
हळुवारपणें तू दीन धरा झाकिली.

तव करा लागले दंवबिंदू हासरे,
तेजाळ बनवुनी त्यांचे माणिकहिरे,
चमकवुनि आपुल्या तू भूषविलें धरे.

तरुडोंगरमेघांवरी रंग बहरले,
घेऊन मनोहर काही त्यांच्यांतले,
सौंदर्यें कोमल देती तव कुंचले.

वाणीस करूनी चंद्रकळा शीतळ,
वर्षून तियेंतुन भावकिरण निर्मळ,
तू धरेस दिधलें ध्येय नवें उज्ज्वल.

स्वरभाव कोवळे वेचुन विश्वांतले,
भारतीय वीणेवरी तुवां छेडिले,
        अन् ‘ गीतांजालिने ’ धरेस या निववि‍लें.

जन्मून भारतीं किमया केली तुवां,
तू गुरुस्थान दाविलें अखिल मानवा,
        गुरुदेवा, यास्तव देते धरणी दुवा.

हा हाय ! परी ती गभीर तेजस्विनी—
पाहिली जवळुनी मूर्त अमृतवर्षिणी !
        दिसणार कशी अन् सुधा स्रवे कोठुनी ! !

३० ऑगस्ट १९४१
विश्रामबाग, सांगली

## ६१. गोपाळ कृष्ण गोखले !

सुनीत– शा. वि

धीरोदात्त तुझी अजून हसरी मूर्ती पुढे खेळते,
तें बुद्धिप्रभ लोचनांतिल दिसे औदार्य आकर्षक !
ती गंभीर सहिष्णुता, वदनिंची शांती मनोदर्शक,
तो मंजुध्वनि वाक्प्रवाह, पुढती सारें उभें राहतें !
त्वन्मानव्य अगाध ! नित्य रमलें देशैकभावें मन,
राष्ट्रांच्या प्रगतींत पाऊल पुढे केव्हा पडे हिंदवी,
या चिंतेंत जळून, दूर करण्या दुःखें तशी यादवी,
सोशी घाव अघोर ऐरणिवरी, घायास तेजःकण !
होतें व्याकुळ चित्त ! बांधव तुझ्या दारीं तदा पातले,
अश्रूंनी हसरें कलेवर तुझें ते न्हाणुनी वंदिती !
कार्यामाजिं तुझ्या अलौकिक असें देवत्व ते पाहती,
तें हृमंदिरिं साठवून, सुमनीं त्यांनी तुला पूजिलें !

दृश्यादृश्यकणांत हें प्रगतिचें चैतन्य आलोकितों,
अन् मी भारतसेवका, तुज मनोभावें हृदीं वंदितों !

१० फेब्रुवारी, १९२४
पुणें

## ६२. शनवार वाडा

सुनीत–गजल–वृत्त —वसंत

तुझ्या विच्छिन्न रूपाला बघूनी फाटतो ऊर !
हळाळे जीव; अश्रूंचा स्मृतींनी दाटतो पूर !
तटांच्या भंगल्या भिंती फुटोनी चौथरा गेला !
जळालीं वैभवें सारीं; निमाले छातिचे शूर !
इथे तल्वार बाजीची विराजे, मस्त रंगेल,
इथे झेंडा मराठ्यांचा उडे वाऱ्यावरी स्वैर !
हिरीरी वीर भाऊची, मनीचा त्वेष चेतून,
हटानें नाचवी घोडे कुरुक्षेत्रांत चौखूर !
अरीला कापवी भीती; इथूनी माधवी नीति !
पुकारी पेशवाईचा दरारा भारतीं दूर.
विखारी गारदी घाला निखारे मत्सराग्नीचे,
विचारी युक्तिनी सारें जहालें शांत काहूर !

मराठेशाहिच्या मार्गे जरा होती तुझी आस,
निमालीं शाहसूनूचीं परी ध्येयें महामूर !

सभोती फुर्फुरे घोडा, झुलावा हत्ति दारांत,
तिथे का रान माजावें ! कुठे तो वैभवी नूर !

फवारोनी जिथे धारा रुपेरी सांडले बिंदू,
तिथे हा पद्मकारंजीं विटांचा कोरडा चूर !
मराठी शूर मर्दांचे पवाडे गायिली वाणी,
घुकारावें दिवाभीतें तिथे का काढुनी सूर !
खरावें काय जोत्यांनी फुटूनी, काळवंडूनी !
कड्यांनी हाय, गजावें; दिसावें रूप भेसूर !
तृणांची लाट ही हाले; कुणाचे शूर रोमांच ?
रणींच्या त्याच मर्दांची असे वा काय हुर्हूर ?
स्मृतीनें पाहणें आता मराठी तेज वा वाणी,
नको गे कल्पने धावूं; बरें होणे मनीं चूर !

कुणाला नांव ठेवावें ! नशीबा लावणें हात !
कुठे कोणाकडे पाहूं, निराशे जीव आतूर !

२९ ऑगस्ट १९२३
पुणें

## ६३. निजलेल्या वसंतास– !

वृत्त–पृथ्वी

गळ्यांत कर टाकुनी चिमुकला, मला बांधुनी,
मुखास मुख लावुनी बिलगलास, विश्वासुनी;
हळूच मग बोलसी अडखळून ‘ नानें म्हना ’
सुरावर सजे हि मी रिझविण्यास तूझ्या मना !
सुरेल रव ऐकतां चलन सर्वही थांबलें,
तुझे चमकदार लोचन वरी बघूं लागले !
क्षणांत लय लागला, कमलनेत्र भारावले,
अपाप मिटलीं दळें, भ्रमर झाकले आंतले !
अशा मधुर मी सुखी तुजासि पोटिशीं घेउनी,
सुखांत पहुडे तुझें मुख पुनःपुन्हा चुंबुनी;
हळूच मग सोडवी कर; जरा बसूनी दुरी,
करांत कर घेउनी, नजर लावि तूझ्यावरी.
मुखावर तुझ्या अशी अचळ दृष्टि मी लावुनी,
मनांत रमतों सख्या, हृदय जातसे लोभुनी;
तरंग उठती किती वदनचंद्र हा पाहुनी,
असेल सुख कोणतें अतुल राजसा, याहुनी !
विशाळ तव भाळ हें, रुळति त्यावरी कुंतळ,
मनोहर किती तयामधुन शोभतें काजळ;
कमान भुवया तुझ्या गरुडपंख कीं दाविती,
गुलाबकळिका टपोर तव लोचनें भासतीं !

तुझी सरळ नासिका मदनबाण पुष्पापरी,
उषा मधुर बिंबली जणुं तवाधरीं लाजरी;
तियेंत लपल्या जणों धवल तारकांच्या कळ्या,
मधेच हसतां किती खुलति गोड गालीं खळ्या !
लहान जिवणी तुझी, हनुवटी तियेखालती,
सुरम्य मधली वळी खुलविते मुखाला किती !
सतेज सुषमा मुखावर तुझ्या किती शोभते !
प्रसन्न मुखशांति ही मजसि भारुनी टाकिते !
निरभ्र तव भाळ मी बघुनि रंगतों चिंतनीं,
विलोल वदनांबुजीं नयन बैसती गुंतुनी;
क्षणांत ढग साठुनी तरळती मनोभ्यंतरीं,
कितीक मग अश्रुन्या कढुन, वाहताती सरी !
'विकासुन मनोज्ञ हें कमल, गंध जावो दुरी !
अमंगल तुला शिवो नच ! मिळो जगा माधुरी !
मनांत अशि बोलतों मग कितीक आशीर्वचें,
हळूच कुरवाळुनी, सुमन चुंबितों गालिचें !

२९ मार्च १९२४
पुणें

## ६४. निशाणरोवणी !

जाति – सूर्यकला

चल, निशाण धर हें करीं,
पुढे चल नेटाने वरि, वरी ॥ ध्रु० ॥
युद्ध माजलें चहुबाजूंला,
वीराला प्रतिवीरहि भिडला,
उठली दंगल खरी ! पुढे चल०
समशेरींची खणखण चाले,
तुटती भाल्यावरती भाले,
चमकुनी बिजलीपरी ! पुढे चल०
चढण कड्याची पुढली अवघड,
परि जे चढले घ्यायातें गड,
स्मरुनि तया अंतरीं ! पुढे चल०
करितिल खालुन दुर्दम मारा,
भिडतिल पाठिस बाण भरारा,
कच खाइं न रतिभरी ! पुढे चल०
जीवित केवळ धूमधडाडी,
जय त्याला, जो सत्पथ काढी,
निशाण परि सावरीं ! पुढे चल०

४ ऑगस्ट १९२९
पुणें

## ६५. मावळ्याचें गाणें ! छंद–श्रीरंग

[ छत्रपती श्रीशिवाजीमहाराजांच्या समाधीचें दर्शन घेण्यासाठी काही मावळे रायगडास जात आहेत व तोंडानें हे गाणें म्हणत आहेत, अशी या कवितेची भूमिका आहे. ]

चला रायगडा शिवरायाचं दर्शन घेवूं ॥ ध्रु० ॥

ठेवून म्होरलं धोरन,
ज्येनं बांदलं तोरन,
संगं घेवून मावळ भावू !

घेवुन गडी दमूदार,
केलं दुस्मन ठार,
त्येची युगत शिकाया जावूं !

बारामावळ रान,
धरमाचं निशान,
ज्येनं रोवलं घेवून ठावू !

बांदुनूश्येनी आरमार,
घेरला समिंदर् पार,
त्येच्या नौकंची किरत गावूं !

आईभनीसमान–
परनारीस मान,
ज्येनं देवून मिळवलं नावू !

मायबोलीचा जोर—
करि दरारा थोर,
त्येचा पवाडा ऐकत व्हावूं !

भग्वा झेंडा फिरवून,
जरिपट्का मिरवून,
झाला समशेरीवर जो रावू !

म्हराठ्यांचा बाणा—
गेला गाजवून राणा,
त्येच्या समाधीवर फुलं वाहूं !

१ ऑक्टोबर १९२९
पुणें

## ६६. माळावरील शिरीष

मुक्तछंद

निखारे फुलले !
कडकूं लागली फाल्गुनी आग !
रखरखलीं तापून रानें !
वाफा उफाळल्या शेतांमधुनी भगळी पडूनी !
कढूं लागला मध्यान्हवारा तावतावूनी !
डबक्यांत पाणी चटचटलें !
खालीवर सारा डोंब जहाला !
पांखरें लपलीं कुठे झुडुपीं !
भयाण शून्यता ! !

आणि एकला तू उभा त्यांत !
निष्पर्ण जीवन ! !
भोवतालीची अंतरांतली,
आग पिऊनी कंठिसीं जीवन;
फांद्यांचे खराटे होऊन गेले,
अस्थीचर्मांचे सांपळे जणू उरलेत हे !
वाळल्या शेंगा पिवळसर—
मात्र लटकुनी भेसूर आवाजें खुळखुळतीं !
उध्वस्त ध्येयांचीं पिशाचेंच की ?

जीवन मिळतें कोठून तुला ?
आणि कशास्तव पंचाग्निसाधन घोर चाललें ?

हिरवीं दाट सुंदर पानें—
हिरव्यापांढऱ्या मृदुल फुगीर परागांचीं तव मोहक फुलें,
सुगंध जयांचा घेई ओढूनी अंतर्भावना,
सौंदर्य जयांचें उपकारक,
वर्षा—हेमंतांनी वाढविलेला तेजस्वीपणा किती अभिजात,
नवीन वाऱ्याने दिलेले सूर वितळवूनी—
सुगंधांतूनी दिले जयांनी वृद्ध—युवका,
तरुणांनी जी हृदयावरी ठेवीली भूषा,
आणि प्रमदांनी पुरंध्रीनीहि—
शिरोधार्य जीं, मस्तकीं धरिली,
शिशिराने तीं धुळींत गाडलीं ! !

किंवा जाहला हृदयपालट फुलांनी तुझ्या,
अन्यायें अथवा फिरलीं मस्तकें ?
म्हणुनी तयांनी जग पेटविलें;
तरी लटकलीं मृत शरीरें फांदीफांदीवर ?
कुणासाठी हें चाललें तपन ?
उराशीं कां तू हीं शवें धरिलीं ?
भोवतालचे अन्याय, जुलूम, उपासमारी,
वाममार्गांनी संपदेची वा लूट होऊनी,
धरणी पडली असहाय ही !
आणि पाहून हृदय तुझें तळमळलें,

भाजून निघालें तडफडून,
उपाय हरले म्हणून होऊन विरक्त तुवां हा—
संन्यास घेतला ?

प्रतिकाराची प्रेरणा फसली,
म्हणुन पुन्हा चालविली ही ध्यान—धारणा ?
त्यागिलीं पानें, त्यागिलीं फुलें, त्यागिलें जीवन !
मात्र उराशीं हुतात्म्यांचीं हीं धरुनी शवें,
भगीरथापरी उद्धरायाला गंगाजलाने,
नव्या तेजाची नव संचणी चालविली का,
जुन्यांतून ही ?

खुळखुळूनी चमकुनी तों हसलीं शवें !
तापलेली येतां झळ नवीन,
विवळून एका फांदीमधूनी सूर निघाला—
" जीवन घेतों शोषून आंतून,
आणि कुंडलिनी जगविते मला अमृत देऊन,
अमृत तेंच दिधलें बीजांना,
अमृत तेंच आंत सांडलें,
जातील शवें हीं गळून दूर माती होऊनी,
अमृतजीवनें कोंभ येतील नवीन परी,
कोंवळीं पानें चमकतील,
आणि त्यावर मोहरेल गोड नवा फुलोरा;

बहरेल त्याच जीवनीं अंग,
हिरव्या पांढऱ्या मृदुल फुगीर परागांचीं मग मोहक फुलें—
शांतिजीवनार्थ शांत आहुती द्याया सुगंधी, दाहक होतील !
हेंच जीवन ! हेंच जीवन ! ! हेंच जीवन ! ! ! ”

**२९ ऑक्टोबर १९४५**
**विश्रामबाग, सांगली**

## ६७. निवात !

सुनीत–शा. वि.

[ प्रियमित्र कै. माधवराव पटवर्धन यांच्या पुण्यांतील ‘ निवांत ’ घरास उद्देशून ]

येथे आपण बैसुनी नवनव्या काव्यामधें रंगलों,
        रात्री जागवुनी किती हितगुजें केलीं जिवाचीं नवीं,
पाहूनी घरवात सुंदर तुझी कौतूहलें हासलों,
        वात्सल्याश्रु तुझे इथेच दिसले, पाहून बाळें भवीं !
विद्वद्‌गोष्टि इथे करीत बसलों स्नेहाळ मित्रांसवें,
        केव्हा तुंबळ वाद माजवुनिया, घोरांदरें खेळलीं,
झालों आणि पळांत एक, सुहृदा ! ढाळूनिया आसवें,
        बंधुत्वें रिझवूनिया शमविलीं संसारतापावली !
येथ आठवतां प्रसंग समरी, आधार वा लाभले,
        गेलें अंग शहारुनी, बघुनिया रक्ताळलेलें जिणें !
आणी थोर सरस्वती परि इथे त्वत्कीर्तिचीं मंगलें,
        झालें शांत ‘ निवांत ’ सार्थ सुहृदा ! लोपून गेलीं रणें !

काळानें परि घोर अर्थ भरला नांवांत या नाकळे !
आता येथ थरारुनी, करपुनी काळीज हें जाकळे ! !

२१ जुलै १९५१
विश्रामबाग, सांगली

## ६८. दीपिका !

छंद—दासी

स्नेहल, स्नेहल दीपिका जिवाची !
सुवर्णचंद्रिका तूच अंतराची ! ॥ ध्रु० ॥

होतों यौवनाच्या देहलीवरती,
नव्या रम्यतेची सेवीत भरती;
अंगप्रत्यंगांत भाव भाव दाटे,
शहारले अंगीं गोड गोड कांटे !
छटा चहूकडे खुले गुलाबाची !

कोवळीक माझ्या भरली अंतरीं
नव्या नवलाच्या लहरी लहरी;
स्वप्नतरंगांचा भवती महाल—
उभवून, आंत वावरे खुशाल !
पाजळून तेजें माझिया ध्येयाचीं !

आणि अंधारलें भोती अकस्मात !
आकाशांतलीहि काजळली वात !
गजबज झाली मनीं अंतराळीं,
लोपतांच स्वप्नें सारीं अंतराळी !
प्रगटलीस तों देवता तेजाची !

शांत तेज तुझें जणू नंदादीप,
जीवनमंदिरीं तेवला समीप !

नव्हे, आकाशींची तारका पातली,
मार्ग दावायाला वरून धावली !
बहरली तान की दीपरागाची ?

स्नेहांतून तुझ्या तेजाळले भाव,
अष्ट सात्विकांचा घेऊनिया ठाव !
भलें बुरें तुझ्या तेजांत न्यहाळीं,
संकटें अंधार कोसळतां भाळीं !
निकषली प्रत अग्नींत सोन्याची !

यौवन धगीनें जरी करपलें,
अंतरीं चैतन्य नव उमललें !
गुलाबी ध्येयें तीं पुन्हा फुलोरलीं !
चिरतरुणाचीं वृत्ति मोहरली !
जादू ऐशी तुझ्या दिव्य सामर्थ्याची !

गुलाब ! गुलाब आता भोंवताली !
सुगंधाचीं तळीं हवेंत साचलीं !
भरभरूनिया त्यांच्याच अंजली,
देईन तयांना, ज्यांचीं हीं सांडलीं !
अखंड उजळी ज्योत सौंदर्याची !

**२१ ऑक्टोबर १९५३**
**विश्रामबाग, सांगली**

## ६९. मनीषा !

जाति—नववधू

गतिमान नदासम मी व्हावें,
फोफावत पुढती नित जावें ! ।। ध्रु० ।।

कधी घेउनी डोंगरांतली—
मायघरांतिल जळें आपलीं,
स्नेहल नदिचीं, ओहळांतलीं,
रान भिजवुनी फुलवावें !

वर्षर्तूचे ढग विरघळतिल,
आकाशाच्या गंगा गळतिल,
कधी विजांनी झरे उफळतिल,
अमृत तें मी रिचवावें !

कस मातींतिल, जीवन आंतिल,
तेज रवितलें, प्राण वायुंतिल,
विशालता या आकाशांतिल,
देत शिवारा जिववावें !

दुःखीं कढलीं दीन आंसवें,
आनंदांतिल अश्रुकालवे,
रसारसांतिल भाव नवनवे—
मिळवुन द्यावे ओलावे !

पुढे पुढे मी क्षितिजापाठीं,
ओढ लागुनी नवतेसाठीं
जुनी वाहुनि संस्कृतिसाठी
खंड नवनवे शोधावे !

ताऱ्यांचें आकर्षुन पाणी,
सरस्वतीची भूगत वाणी,
मिळवुन माझी तींत कहाणी,
बाग नवे मी उठवावे !

कष्टुन कष्टुन कणाक्षणानें—
वृत्ति मिळविली जी अभिमानें,
करुन मानवा तिची तर्पणें,
पराविया सुखिं विरमावें !

२८ ऑक्टोबर १९५३
विश्रामबाग, सांगली

## ७०. मुरली !

जाति–मनमोहन

तुझि मुरली मधुर मुकुंदा, मज ऐकूं दे जरा ॥ ध्रु० ॥

मज तहान कधिची लागे,
म्हणुनि ही सुधा तुज मागे,
निज मधुर स्वरपीयूषें झणिं जिववी ही धरा !

हृदयांत उठे जो नाद,
द्यावया तया पडसाद,
संगीत घुमवि अधराने मृदुभावें सुंदरा !

लागुनी तीव्र हुरहूर,
अंतरीं खळाळे पूर,
करिं शांत सूरजादूने हृदयाच्या सागरा !

हृदयाचें हरिसी गूज,
ठाऊक कसें तें तूज,
अंगुलिने आळवि त्याची मृदुभाषा सुस्वरा !

पीत ती शांत चिरकालीं,
झोपेन तुझ्या हृत्कमलीं,
वायूंत माधुरी जाई जशि मिळुनी, बंधुरा !

५ जुलै १९२८
पुणें

## ७१. मूक संगीत

जाति–अवनी

सूर नको, शब्द नको थांबुदेत गानें !
रवकारी संगीतिं न जीव समाधाने ।। ध्रु० ।।
ओढयांचा खळखळाट,
वाऱ्यांची गीतलाट,
सकल हें अपूर्ण थाट,
आंतर मज मुग्ध गीत ऐकवूंत रानें !
वीणेचा गोड स्वर,
प्रितिगीत शब्दमधुर—
वाटतें न पूर्ण, रुचिर,
अचल मूक शांतिसूर हरपवूंत भानें !
शब्दहीन गाढ रात,
चंद्रतारका प्रशांत,
तुंग अचल शुभ्रकांत,
श्रवण भरुंत नीरव निज आंतल्या सुराने !
शब्द शब्द, सूर सूर—
विरुनि, जिथें शांति मधुर—
नांदते अथांग दूर,
माधुरी तियेंतली मिळो नितांत पानें !

२१ एप्रिल १९२९
पुणें

## ७२. संसारवन

छंद—अभंग

काटेकुटे रानी किती या माजले,
फुलांचे साजले वृक्ष परी.
दगडधोंड्याला पाय ठेचाळती,
हिरवळ मोती परी मऊ.
हिंस्र आरोळ्यांनी जरी रान भरे,
निर्झरपांखरें गातीं इथे.
प्रखर उन्हाने तापे रानकाया,
परी गार छाया कुठे भारी.
संसाराच्या रानीं दुःखसुख ऐसें,
ठेविलें आपैसें दयाळा तू !
कशासाठी बोल लावावा मी तुज,
सापडतें गूज, नीट जातां !

२३ ऑक्टोबर १९२८
पुणे

## ७३. काढणी

छंद—अभंग

गोळा केलीं बीजें कसोशीने सारीं,
सुक्षेत्रीं पाभरीं ओतिलीं मीं;
उत्तम संस्कार केले कमाईने,
विशुद्ध जीवनें चोजवीलीं;
रोपांरोपांतून वेचुनिया तण,
केली भांगलण खपूनिया;
पावसाची धारा, ढगाचा निवारा,
आणि ऊन वारा, लाभे दैवें !
डोळसपणाने राहूनी तत्पर,
कीड केली दूर सत्वरसें;
काढणीस जातां कसदार आता,
भरदार हाता पीक देई !

२२ जुलै १९३८
पुणें

## ७४. सहकार

छंद-अभंग

कोय लावियेली, रोप मुगारलें,
संगोपून दिलें खतपाणी;
ऊन, थंडी, वारा, पावसाच्या गारा,
करून निवारा वाढवीलें;
सहकार झाला अभिजात तरू,
आनंदाने भरूं मन लागे;
आणि एक दिस डहाळी डहाळी—
पूर्ण डवरली मोहराने;
कोकिलकूजित सुरू झालें तेथ,
विपुळलें शेत गंधगानीं;
लागूनीया ओढ गेलों तरूखाली,
तोंच कडाडली शिरीं फांदी;
नको सावली ती, नको गंधगान;
पायीं तुझ्या स्थान एक बरें !

१५ ऑक्टोबर १९३८
पुणें

## ७५. पाठीराखा

छंद—अभंग

कुणाचा मी कोण मनास विचारी,
नाही घरीं दारीं कुणी माझें ?
अंतरींच्या कळा बोलूं कुणापाशीं ?
जेवून उपाशी सदाचा मी !
पेटलेला जाळ कसा मी शांतवूं ?
कुठे मी निरवूं अंतरातें !
कधी हृदयींची सरे हुरहुर ?
थांबावें आतूर किती दिस !
ये ये एकदाचा तूंच माझा सखा,
तूंच पाठीराखा जीवनीं या !

२१ ऑक्टोबर १९२७
पुणें

## ७६. ध्यान

छंद—अभंग

संसारतापाने जीव जधी पोळे,
कृपामेघ वोळे तेव्हा तुझा;
त्रासूनिया कोठें ओढयाकाठीं जावें,
ध्यान एक ध्यावें तेथ तुझें;
जळाची खळखळ, झाडांची पालवी,
जिवाचा घालवी ताप दूर;
ध्वनि गोड तुझा ऐकूं येई त्यांत,
रूप फुलोऱ्यांत दिसे तुझें !
गायक तू थोर, सौंदर्याचा ठेवा,
नाही शांति जीवा तुझ्यावीण !
शांतवाया मन एक तुझ्याठायीं,
जीव धाव घेई म्हणूनीया !

२९ मे १९२४
रहिमतपूर

## ७७. याचना

छंद–अभंग

किती करूं आळवणी   कधी येई करुणा मनीं,
तुझ्या गोड बोलाविण   जीव जाहला हैराण !
चौदा पाऊस वर्षले   प्रेमरोप जोरावलें,
आता जगीं मी एकला   साहे कैसा बोल मला !
देह दोन मन एक   झाली जीवा आणाभाक,
पोटीं दुःखाचे उमाळे !   जगीं प्रेमाचे उन्हाळे !
सांगूं कुणा, बोलूं काय?   जिवा लागली ही हाय ! । किती०

कडे, डोंगर, पठार,   नद्या, ओहोळाची धार,
वृक्ष, वेली वा पांखरें   बोल बोलती हे वारे;
खेळूनीया गीतें गाती   मन रिझवूं पहाती;
परी गोड तुझा ध्वनि   कानीं येईना त्यांतुनी !
चित्त लागेना त्या गानीं   ध्यास एक तुझा मनीं !
बोल नाही तुझा तरी   शून्य वाटे विश्वावरी !
पोटीं कढावरी कढ   येतां जातां झालों मूढ !
सांगूं कुणा, बोलूं काय?   जिवा लागली ही हाय ! किती०

कंदरीं वा कड्यावरी   डोंगराच्या टोकावरी,
कुठे एकलें बैसावें   वेडेंपिसें जीवें व्हावें !
ग्रह, चंद्र, सूर्य, तारे   येती जाती क्रमें सारे,
अंतरीचें दुःख परी   कोण जाणे हें अंबरीं !

जो तो स्वतांशीं रंगला ! जीव तरी वारा प्याला !
माया केली का पातळ ? कोण शांतवी हा जाळ ?
जीवसख्या, माझें कोण सांग आता तुझ्यावीण ?
सांगूं कुणा, बोलूं काय ? जिवा लागली ही हाय ! किती०

२० एप्रिल १९२१
महाबळेश्वर

## ७८. आभार

छंद– अभंग

किती मानसीं मी आभारावें तुला !
करावासा खुला गळा वाटे.
दुष्टाईची भोती ठेवूनिया माया,
तियेची न छाया पडूं दिली;
खारट सागरीं दिलें पाणी गोड,
गानाची वा जोड घोर रानीं !
मात्र भिववोनी सारखें जीवातें,
पुढील मार्गातें जाणविलें;
आणि चांगल्याचे घ्यावयास गुण,
अंतरीची खूण दावियेली;
वाहलों असतों कुठे नाही तरी,
कृपेच्या पांखरीं झाकिलेस !
कैसें व्हावें तरी आता उतराई ?
येतों तरी पायीं भारावूनी !

२७ ऑगस्ट १९२९
पुणें

# र स ग्र ह ण

## १. प्रीति

### १. गाणाऱ्या मोहिनीस :

या जातीचें नांव **मोहिनी** हें आहे. कै. डॉ. माधवराव पटवर्धन यांनीं ' छंदोरचना ' या ग्रंथांत या जातीला नांव देतांना या कवितेंतील पहिल्या ओळींतील ' मोहिनी ' हें नांव निवडून तें निश्चित केलें. विनायक ( करंदीकर ) कवीच्या ' महाराष्ट्र लक्ष्मी ' या कवितेवरून तिला ' महाराष्ट्रलक्ष्मी ' असेंहि एक वैकल्पिक नांव देण्यांत आलेलें आहे.

### २. क्षण भेटलों :

' र. कि. मं. 'च्या पहिल्या ' **किरण** ' या पुस्तकांत ही कविता जेव्हा प्रथम प्रसिद्ध झाली, तेव्हा तत्कालीन टीकाकार श्री. बा. अ. भिडे यांनी तिजवर विविधज्ञानविस्तारांत झोड उठवली ! त्यांच्या कोपाविष्ट लेखणीला बळी पडलेल्या ' किरणांतील ' तीन कविता म्हणजे माधव जूलियन् यांची ' कौमार्यस्मित ', माझी ही ' क्षण भेटलों ! ' व यशवंतरावांची ' शीलवती सुंदरीस ! ' या होत. या टीकेने ' किरण 'ला व 'र. कि. मं.' ला एकदम खूपच प्रसिद्धी मिळाली !

या गज़लाची रचना फारसी पद्धतीची आहे. यांतील 'पथिं भारुनी... शर जाय गे उरिं मारुनी ' यातील ' र ' ची पुनरुक्ति, ' मधुरस्वरे ' या संबोधनांतील साभिप्रायता, ' प्रकंपित ' या विशेषणाने ' अधर ' शब्दाचे वाढलेलें सौंदर्य व पुढील ओळ सातपासून बारा अखेर आलेले ' वाजलें, पाहिलें, राहिलें ', ' चपलेक्षणीं लपलीस तूं ', ' दुणावलें, जाहलें, उचले न

पाउल चंचले ' हें आंतर प्रास गज्जलाच्या घाटणीला भावपोषक झाले आहेत.

## ३. अनुक्त प्रीति :

प्रीतीचें खरें सौंदर्य उक्ततेंत नसून अनुक्ततेंत असतें, हा या कवितेंतील भाव आहे.

**पाचवी** = हिरव्या ( 'पाचू'पासून केलेलें विशेषण ); **प्रस्फुरूनी** = प्रकर्षाने स्फुरण पावून; **योगीं वियोगीं** = मीलनांत, विरहांत; **समाधी-योग** = एकरूप होण्याची संधी; **गूढ** = केवळ अनुभवानेच जाण्यासारखी.

## ४. हृदयदान :

' खरी प्रीति आत्मतृप्त असते ' ही यांतील कल्पना आहे.

**शुद्धरूप** = प्रीतीचें निःस्वार्थी स्वरूप.

## ५. बहाणा :

( नावडे मला ) **जें** = जें जें; **जिववितेस** = ( जिवाचें ) पोषण करतेस; **छाया**= छायाचित्र.

## ६. हृद्गत :

**मुलायम** = मऊ, नाजुक; **गेंद**= गुच्छ, झुबका; **हृद्गत**=( माझ्या ) हृदयांतील भाव, रहस्य.

## ७–८. भेटीनंतर, सरस्वती :

हीं दोन्ही सुनीतें एकापुढे एक अशीं एकदम वाचावयाचीं आहेत. कारण, त्यांतील मध्यवर्ति कल्पना किंवा आशय एकमेकांशीं निबद्ध आहेत.

प्रेयसीला भेटण्यास अत्युत्कंठित झालेल्या मनाला प्रत्यक्ष तिच्या आगमनाने उदासीनता कां येते, हा पहिल्यांतील भाव आहे; तर या

उदासीनतेची निरानिराळीं कारणपरंपरा पुढे करणें हा दुसऱ्यांतील भाव आहे; शेवटीं 'प्रीति-सरस्वती ही अशीच मधून मधून गुप्त होते' असें म्हणून 'काव्यालिंग' अलंकाराने तिचें समर्थन केलें आहे.

**वाटे नको मेदिनी** = हें पृथ्वीवरचें म्हणजे रोजचें कंटाळवाणें जिणें; **वेंगुनिया** = वळसा घालून, मिठी मारून; **दिठीं** = दृष्टीने; **काव्यात्मता** = सौंदर्यवादी (Romantic) भाव; **'रम्याणि वीक्ष्य'–स्वरीं**= शाकुंतल नाटकांतील पुढील श्लोक गुणगुणण्यांत– 'रम्याणि वीक्ष्य मधुरांश्च निशम्य शब्दान्, पर्युत्सुकी भवति यत्सुखितोऽपि जन्तुः॥ तच्चेतसा स्मरति नूनमबोधपूर्वम्। भावस्थिराणि जननान्तर–सौहृदानि'; **सरस्वती**= ही नदी जमिनी खालून गुप्तपणे वाहते अशी समजूत आहे.

प्रियकराच्या मनांत एक प्रदीर्घ आंदोलन कसें होऊन जाते, त्याच्या मनांत कोणकोणते विविध भाव निर्माण होऊन जातात व शेवटीं आपल्या या आंदोलनाचें समर्थन तो कसें करतो, हें मानसशास्त्रीय दृष्ट्या पाहण्यासारखें आहे. तसेंच 'प्रेयसीच्या प्रत्यक्ष येण्यापेक्षां तिच्या येण्याच्या कल्पनेंत काव्यात्मता अधिक आहे' हें त्यास कसें वाटतें, हेंहि पाहण्यासारखें आहे.

## ११. तुझ्यावांचून :

**हृदयांनी हृदयांत** = प्रियजनांनी एकमेकांस (रहस्यें सांगून गोडी चाखली); **करुणल्या ... राशी** = मला अत्यानंद होऊनहि तो सर्व मावळला!

## १२. भास :

पूर्वपरिचित अनुभूतीमुळे प्रिय व्यक्तीचे वा गोष्टींचे भास होणें ही एक मानवी जीवनांतील विलक्षण गोष्ट आहे. काही स्थूल वस्तूंच्या स्पर्शाने वा दृश्याने मनांतील सूक्ष्म प्रत्यय कसे जागृत होतात, याचें चित्र या कवितेंत

असून, शेवटीं ‘ भासांना सत्याचें स्वरूप कधी येईल ! ’ असा प्रश्न त्यांतील प्रेयसी करीत आहे. बुद्धीला ईश्वरी साक्षात्काराचे होणारे भासहि असेच असतील!

कवितेची गति पृथ्वीवरील तृणापासून आकाशांतील अरुणकांतीपर्यंत म्हणजे जडापासून सूक्ष्मापर्यंत कशी आहे, तें पहा.

## १३. मधुरमीलन :

ही कविता मागील ‘ भास ’ या कवितेसारखीच गूढ अनुभवाची द्योतक आहे. प्रेयसीने एकदा प्रियकराचा गोड शब्द ऐकला होता व त्याचें मधुर हास्य पाहिलें होतें. आज एकाएकी तिच्या मनांत चांदणें फुललें ! ही जादुगिरी बहुधा त्याच शब्दाने वा त्याच हास्याने केली असावी, असें तिला वाटतें आहे; इतक्यांत तिला त्याचा स्पर्श झाल्याचा व त्याने आपल्यास झेलून घेतल्याचाहि भास होतो. हे गूढ अनुभव येत असतांनाच ती हे उद्‌गार काढीत आहे।

**लहरुन की ठेली** = ( त्या शब्दांतील नादाच्या तरल तंरगांनी ) ही सर्व सृष्टी भरून राहिली आहे काय ! ; **ज्योत नितळ** = निर्मळ तेज; **अमृतपूर** = अमृताचा गोडवा; **अदूर** = ( अगदी ) जवळ.

## १४ तेढ :

**घाव लागे...जाळ :**

या पहिल्या ओळींत ‘ असंगति ’ अलंकार व दुसरींत ‘ विरोध ’ अलंकार आहे.

**हाय** = झळ; **दिलरुब्याचे बोल** = प्रियकराचे मधुर शब्द.

## १५. विरहिणी :

हें एका आधुनिक विरहिणीचें भावचित्र आहे. पतिपत्नींचा संसार अत्यंत सुखाचा व अन्योन्य प्रेमाचा आहे. अशा स्थितींत तिला सोसावा लागलेल्या विरहाच्या वेदना ती आपल्या मैत्रिणीस सांगत आहे.

**मुधा** = वेड्यासारखें, वेडी होऊन; **हृदयंगम** = सुंदर, रसपूर्ण; **विरसविती** = विरस करतात म्हणजे अस्वस्थ ( पर्युत्सुक ) करून सोडतात; **मांडण** = घरांतील सामानाची ( सुंदर ) मांडणी; **निशिगंध** = पतीने लावलेलीं कुंडींतील निशिगंधाचीं फुलझाडें; **निरवितां** = विश्वासाने ठेवल्यावर, आश्रय घेतल्यावर; **चांदणं फुले** = मनांत चांदण्यांची शीतळता उत्पन्न होतें, माझें हृदय आनंदाने भरून जातें; **झुले** = आंदोलतें, झोके घेत रहातें.

## १६. तन्मयता :

हें एक नाट्यगीत असून यांत तीन व्यक्तींचें दर्शन होतें. एक प्रियकर व प्रेयसी हीं परस्परानुरक्त आहेत; परंतु हें सत्य माहीत नसलेली किंवा याबद्दल संभ्रमांत असलेली दुसरी एक स्त्री या प्रियकराला प्रश्न विचारून आपल्या प्रीतीला अजून काही अवसर आहे का याचा अदमास घेत आहे. यांत बोलणारी व्यक्ति एकच–म्हणजे ही दुसरी स्त्रीच फक्त आहे. आपल्या मनांतील या प्रियकराला एखादा मार्मिक प्रश्न विचारावयाचा, त्याचें उत्तर मिळवितांना त्याच्या चेहऱ्यावरील भाव न्याहाळून पहावयाचे व त्याचा अर्थ उमजावयाचा, असें तिचें ' शोध घेणें ' चाललें आहे.

प्रत्येक कडव्यांतील दुसऱ्या ओळींतील उत्प्रेक्षेनें वा अन्य अलंकाराने रसाचा परिपोष झाला आहे.

**पोई** = पाणपोई; **दंवते** = दवांनीं भिजून जातें; **खडा** = अगदी उभा; **पुरुषार्थ** = पराक्रम; **थोरवीचें...भावें** = तुझ्या थोरवीचा कुणी गौरव केल्यास तिचे डोळे किती भावपूर्णतेने मिटतात ! जणुं काहीं त्यांतील आनंद ती डोळे मिटून तन्मयतेने चाखीत असते, असा म्हणण्यांतील भाव.

## १७. पूजास्थान :

एका प्रियकराने आपल्या प्रेयसीचें छायाचित्र चौकटींत बसवून तें आपल्या मेजावर ठेवलें. प्रेयसीला प्रेमाविष्काराची ही उच्छृंखल तऱ्हा

आवडली नाही. म्हणून तिने त्याला आपलें छायाचित्र तेथून काढून टाकण्यास सांगितलें. अशा वेळीं आपला अंतरींचा भाव काय आहे व आपण 'पूजास्थान' कशाला मानतों, हें तो प्रियकर सांगत आहे.

**काहली** = तडफड; **मूर्तिपूजा काढिसी** = माझ्या मूर्तिपूजेला दोष देतेस; **आजवेरी** = आजपर्यंत; **सुना** = रिकामा; **दुणा** = दुप्पट; **प्रीत जाणे त्यागभावाच्या खुणा** = त्यागाच्या खुणा खऱ्या प्रीतीलाच फक्त समजतात; (गुण हेंच ती पूजास्थान मानील, हा भाव.)

## १८. गोड आठवण :

**अंचळ** = पदर, शेव; **वायुला तू शासिलें** = वारा तुझ्या पदराशीं मस्ती करीत होता, त्याला तू चांगलें शासन केलेंस; **पाचमर्वा** = सुवास असलेलीं पाच व मर्वा यांचीं पानें; **उले** = फुटतें.

## १९. शूर्पणखा :

हें एक जुन्या पद्धतीवर लिहलेलें **स्त्रीगीत** आहे. जुन्या स्त्रीगीताची कांहीं एक विशेष धाटणी असलेली आढळून येते. त्यापैकीं उच्चाराची छंदप्रवृत्ति म्हणजे प्रसंगीं ऱ्हस्व अक्षर दीर्घ उच्चारणें व दीर्घ अक्षर ऱ्हस्व उच्चारणें, मधेच लुप्त मात्रांचें आंदोलन घेणें व गीतांतील बोलणाऱ्या व्यक्तीचें वक्तव्य संपलें की गीताचा किंवा प्रसंगाचा समारोप करणें हे काही विशेष असलेले आढळतात. समारोपांतील कडव्याच्या शेवटच्या ओळींतील कल्पनेशीं पालुपद जमेलच असें नाही; तरी देखील स्त्रिया ते म्हणत असतातच (उदा० 'शूर्पणखा गेली मग चिडून। रामा मन गेलें तुझ्यावर जडून!) परंतु हे विशेष कसेहि बरे-वाईट, वा बरोबर-चुकीचे असले, तरी त्यांत एक विशेष गोडी व उच्चारसौंदर्य असतें. स्त्रीगीतांत हींच वैशिष्ट्यें असतात.

'आभाळीं वसनें' व 'घननिळा' हें संबोधन यांतील साभिप्रायता लक्षांत घेतल्यावर त्यांत 'परिकर' अलंकार साधला आहे हें दिसतें.

**स्तिमित** = कुंठित; **मायाविनी** = खोटें रूप धारण करणारी.

या नाट्यगीतांत शूर्पणखा, राम, सीता व लक्ष्मण यांच्या ठिकाणीं कोणकोणते निरनिराळे भाव उत्पन्न झाले व त्याचे एकमेकांवर काय परिणाम झाले, हें पाहण्यासारखें आहे.

## २०. गानमोहिता :

हें एक संवादात्मक नाटयगीत आहे. भूमिकेंत म्हटल्याप्रमाणें हा संवाद नरेंद्र ( विवेकानंद ) व विधवा तरुणी यांमध्यें झाला आहे. पहिलीं पांच कडवीं नरेंद्राचीं आहेत; त्यानंतरचीं तीन विधवा तरुणीचीं आहेत; यानंतरचीं दोन पुन्हा नरेंद्राचीं असून, शेवटचीं दोन कथेच्या समारोपाचीं आहेत. नरेंद्राच्या पहिल्या पांच कडव्यांतील विचार व उत्प्रेक्षा त्याच्या तारुण्यसुलभ पण अध्यात्मिक वृत्तीच्या पेशाला शोभण्यासारख्या कशा आहेत तें पहा. विशेषत: ‘ सुरेल रागिणी ’ व ‘ ईश्वरी काव्यभा ’ यांतील कल्पना व नादमधुरता हीं उदात्त वातावरण निर्माण करतात.

**हास्यतेज** = हास्यांतून निर्माण होणारें अलौकिक तेज; **स्वर्गदेवता** = नरेंद्राच्या मनांत तिला पहातांच ‘ सती ’, ‘ स्वर्गदेवता ’, ‘ मोहिनी ’, ‘ उषा ’, ‘ रागिणी ’, ‘ काव्यभा ’ या कल्पना आल्या; त्यावरून नरेंद्राची मन:प्रकृति व प्रवृत्ति काय होती तें कळण्यासारखें आहे. या पहिल्या पाच कडव्यांत विचाराची निर्मळ उदात्तता, कल्पनेचें पावित्र्य व शब्दांतील सुरेल माधुर्य भरलें आहे. त्याचप्रमाणें तिच्या उत्तरांत स्त्रीसुलभ निरागस लीनता, असहायता व तन्मयता आहे. शेवटचे ‘ भागिनि गानमोहिते ! ’ ‘ अश्रुबिंदु ठिबकले ’ व ‘ त्यागिली तयें विणा ’ यांमधील कल्पना नाटयमय असून, त्या एकामागून एक आल्याने नाटयगीताची परिणामकारकता वाढली आहे.

**गीतबांसरी** = नरेंद्राचा सुरेल बांसरीप्रमाणें असलेला मधुर कंठ व त्यांतून ( कृष्णाच्या ) मुरलीप्रमाणें निघणारें मधुर गीत; **झंकृति** = माझ्या वीणेचे झंकार व कंठांतील गीत; **चारुशील** = जिचें शील पवित्र आहे अशी; **जिव्हार** = प्राण ( तिच्या डोळ्यांतून अश्रु ठिबकले, ते अश्रु म्हणजे

साक्षात् तिचे प्राणच होते हा म्हणण्यांतील भाव ); **ध्येयमग्न** = आपल्या ध्येयांतच ( ईश्वरप्राप्ती, अध्यात्मसाधन ) रमलेला.

## २१. बकुळा :

‘ प्रेमाच्या प्रामाणिकपणावरील हें एक विशिष्ट तंत्र रचनेचें कथाकाव्य आहे. हें संपूर्ण काव्य ५० ओळींचें असून, त्यांत दहा दहा ओळीचा एक एक परिच्छेद आहे. या परिच्छेदांतून घडलेल्या घटनांचीं धावतीं चित्रें दाखवून पण कथेचा धागा अनस्यूत ठेवून, कथा पूर्ण करण्यांत आली आहे. या छोट्या कथाकाव्याचें हें तंत्र व त्याची मांडणी मराठींत नवीन आहे. यांतील प्रत्येक परिच्छेदांतील एक चित्र वा घटना तेवढ्यापुरती स्वयंपूर्ण असून, ती पुढील परिच्छेदाशीं मिळती आहे. अशा पांच परिच्छेदांतील चित्रें एका पुढे एक ठेवली, की संपूर्ण चित्र तयार होतें. एखाद्या चित्रांत ज्याप्रमाणें अगदी थोड्या रेषांमध्ये जास्तींत जास्त भाव व्यक्त केला जातो, त्याप्रमाणेच या काव्यांत शब्दांची कुसर वापरली आहे.

**मुळामुठेच्या** : पुण्यांतील मुळामुठेच्या संगमावरील हिरव्या झाडींत ही कथा घडली आहे अशी कल्पना आहे; **काजळ** = अंधार; **काचा कसुनी** = काचा मारुन; **तांडवगाण्यांत** = नृत्यगीतांत; **प्रीत दाखवी ···कडकडुनी** = प्रीतीने विजेच्या रूपाने कडाडून तिला पाण्यांतील मार्ग दाखविला–प्रीतीच तिचें मार्गदर्शन करीत होती हा भाव; **जीवशशी** = जिवाला फुलविणारा चंद्र; **गडणी**= मैत्रीण; **दूर जरा व्हा**=हें म्हणतांनाचा बकुळेचा संयम अतुल्य आहे; **अबरू अपुली...पाय** = लौकिकाची भीति, बापाच्या अब्रूची कदर व स्वतांच्या मनाविरुद्ध करावा लागलेला संयम यांतील संघर्ष पाहण्यासारखा आहे; **हाय ! कलेवर चंद्रोजीचें** = चंद्रोजीचा मृत्यु हीदेखील त्याच्या खऱ्या प्रेमाची साक्षच आहे; **झाडी भिजली अश्रूंनी** = बकुळा व चंद्रोजी यांच्या जीवनाची ही शोकातिका पाहून निसर्गालादेखील फार वाईट वाटलें हा भाव; यांतील वर्णनें व संवाद कथेला पोषक कसे आहेत तें पहा.

## २२. जीवितेश्वरीस :

**स्तोत्र** = या शब्दानें प्रीतीच्या भावाचें पावित्र्य सूचित झालें आहे; **बोलसुधा** = शब्दरूपी अमृत; **संयतचित्तें** = संयमित भावनेने (शांतपणाने) **विश्वतमिस्रा** = विश्वांतील अंधारी रात्र, जीवनांतील कठिण क्षण; **शब्दपयःस्रोत** = ( तुझ्या ) शब्दरूपी अमृताचा निर्झर; **भाव...पावे** = तुझा भाव ( प्रीति ) अन्य कुणाचें रूप घेऊन, येथे येऊन माझ्या दुःखाचा परिहार करीत आहे का? माझें संरक्षण करण्यास तूच कोणामध्ये प्रेरणा उत्पन्न केलीस काय?

# २. संसार

## २३. आवाहन :

घरामध्यें सून म्हणून येणाऱ्या नववधूला आपण गृहलक्ष्मी समजतों ती घरांत पावित्र्य आणते व आपल्या जीवनसंगीताने घरांत सुरेलनाद घुमविते. जुन्यांची संस्कृती व नवीनांचें पदार्पण यांनी घराला खरा घरपणा येतो. या दृष्टीनेच नवीनांचें स्वागत वडीलधाऱ्यांनीं आत्मीयतेने केले पाहिजे. या कवितेंत एक श्वशुर आपल्या या वेळच्या भावना बोलून दाखवीत आहे. **संमार्जनजळ शिंपिलें** = तुझ्या मार्गावर मी सडासंमार्जन करून तो मी स्वच्छ ( निष्कंटक ) करून ठेवला आहे हा म्हणण्यांतील भाव; **सोनेरी ... फुलविले** = निसर्गाने ही त्याला साथ दिली आहे; **यशोधनें** = माझी कीर्तिरूपें धनें त्यावर पसरलीं आहेत. ( माझी प्रतिष्ठा त्यावर चादरीसारखी मी अंथरली आहे ); **सरस्वती ... तुला** = ही नववधू नुसती 'गृहलक्ष्मीच' नव्हे तर ' गृहसरस्वती 'हि आहे; **परिसर** = आसमंतांतील प्रदेश; **घर-भरणी ... उंबरा** = तुझा ग्रहप्रवेश झाला की माझें घर ( वंश ) फुलेल – त्याला सर्व प्रकारची समृद्धि लाभेल.

## २४. चांदण्यांतील भेट :

**हिरमुसले हे मणी** = या चांदण्या फिकटल्या; **आणि कोणती मूर्त...**

**अंबरीं** = पुण्यवान मृत माणसें आकाशांत चांदण्या होऊन राहतात या समजुतीवर ही कल्पना आधारली आहे; **धवळलें संगमीं** = या कवितेंतील घटनेचें स्थळ सातारा जिल्ह्यांतील कऱ्हाड क्षेत्रांतील कृष्णा–कोयना संगमाजवळील पडका भुईकोट किल्ला हें आहे, हें ध्यानांत घेतलें की 'संगमीं' चा अर्थ कळेल; पुढील 'प्रीतिसंगमीं' या शब्दानेहि समोरासमोरून येऊन भेटणाऱ्या नद्या हा अर्थ अभिप्रेत आहे. **पोटाग** = (आईच्या) पोटांत मुलाच्या वियोगाने होणारें दुःख (आग); **झुळुक अहाहा** ! = इतक्यांत वाऱ्याची झुळूक आली, झाडेंझुडपें हललीं व त्यामुळें सावल्याहि हलल्या; त्याबरोबर पुत्राची सावलीहि हलली असें त्या आईला वाटलें ! या संभ्रमांतच कवितेचा परिणामकारक शेवट झाला आहे.

## २५. मातृहृदय :

**भावस्वरजादु** = भावनेने भरलेल्या तिच्या स्वरांतील मोहकता; **पर्युत्सुक** = अस्वस्थ; **कोमलांग** = ज्यांचा गाभा (अंग) कोमल आहे अशा; **फिरत** = तानेचा दाणेदारपणा; **निरामय** = निर्वेदना, निर्भेळ; **तिचें गाणें रसरूप गंध झाले** = रसरूपगंधानी तिच्या गाण्याचें रूप धारण केलें; **भारताच्या... मुक्ततेचा** = भारताच्या पारतंत्र्यकालांत (१९३५) हें गीत लिहिलेलें आहे हें उघड आहे; **विथिकांनी** = रस्त्यांनी **बाळकंठाला... विकारें** = त्याच्या घशाला रोग (कॅन्सर) झाला; **तिने अपुलें... रक्त त्याला** = डॉक्टरांनी आईचें रक्त मुलाला घातलें; **परी वाचा... गेली** = त्याची अन्ननलिका व श्वासनलिका कापावी लागली त्यामुळें त्याला अन्न खातां येईना; पण त्याची वाचाहि त्याला सोडून गेली !

आपल्या मुलाला आता गातां येत नाहीं, म्हणून आईने आपल्या सुस्वर गाण्याचा त्याग केला ! हा त्याग अलौकिक आहे !

## २६. गानचातुरी :

आईच्या मोठेपणाची ही एक थोरपणीं होणारी आठवण आहे. आठवण काढणारा मुलगा आपण जणु काही आज त्याच लहान वयांत आहों

असें समजून ती काढीत आहे; **खळखळ करि** = त्रास देऊं लागली; **कण्हत बाळ** = लहान मुलें निजतांना कण्हतात व कण्हत निजतात ही कल्पना रसपोषक आहे; **मधुरमीलनांनी** = आईचा स्वर, पाळण्याचें करकरणें व तिचें कण्हणें यांचें झोपेच्या गुगींत होणारें मीलन मधुर असतें; **गानचातुरी** = आपल्या गाण्यांतील सामर्थ्य, कला; **घरवात** = संसार, सांजवात; **जीवनयांनीं** त्या जीवनाच्या विमानांत ( बसून मी कधी फिरेन व ती मौज पुन्हा कधी अनुभवीन, हा म्हणण्यांतील भाव. )

हें एक आठवणवजा अंगाईगीत आहे.

## २७. आईचा आशीर्वाद :

**खऱ्या घरीं** = सासरीं; **चाल माझ्या...तोलानं** = तुझ्या वागण्यांत माझे ( आईचे ), तुझ्या वडलांचे व तुझ्या पतीचे संस्कार एकरूप झाले पाहिजेत, हा आईच्या म्हणण्यांतील भाव; **जीवा मग समाधान** = आईचें समाधानसर्वस्व मुलीच्या सुखांत व लौकिकांत असतें व तेंच ती बोलून दाखवीत आहे व 'मी तुझ्या पाठीशीं सतत आहे !' हा निर्वाळा देत आहे.

## २८. पितृस्मृति :

**भुताटकीपरि** = ज्या वाड्यांत एका काळीं अनेक माणसें नांदलीं तो आज निर्मनुष्य झाल्यावर, मध्यरात्रीं एकट्यादुकट्या माणसाला प्रवेश करतांना भुताटकीसारखा वाटल्यास नवल नाही ! अशा वेळीं घर खायला उठतें ! या सुनीतांतील अनुभव सर्वांनाच येणारा आहे.

## २९. विसरलेला नमस्कार :

**कविगीत** = भावगीत; lyric या शब्दाला प्रा. रा. कृ. लागू यांनी सुचविलेला शब्द; किंवा यशवंत कवींची 'आई' ही कविता; **दिकाला ... फाकलीं** = तुझें स्वरूप फारच व्यापक व सर्वस्पर्शी झालें.

'माझें भगिनीप्रेम हें भक्तीच्या पायरीला पोचलें,' असें म्हणण्यांतील भाव.

## ३०. आत्मनिवेदन :

या सुनीतांत जीवनांतील थोडीशी आत्मकथा आहे. या सुनीताच्या पहिल्या श्लोकांत संसारिक संकटें, जबाबदाऱ्या व गोंधळ यांचें वर्णन आहे; दुसऱ्या श्लोकांत काही त्याग, महत्त्वकांक्षेला मर्यादा व शिक्षणक्षेत्रांत काम करण्याचें ध्येय यांचें यर्णन आहे; पण याहि क्षेत्रांत कुणी तरी अधिकाऱ्याने दटावणी सुरू करून सापळे तयार केले; अशा वेळीं आपली खरी वृत्ती काय निर्णय देते तें यापुढील सहा ओळींत आहे.

## ३१. वियोगिनीचें पुण्यस्मरण :

ही एक पत्नीवियोगावरील विलापिका आहे. भरल्या संसारांतून पत्नी निघून गेली, म्हणून एक पति विलाप करीत आहे व 'पूर्वी घर कसें होतें व आता कसें आहे,' हें सांगत आहे. हें सांगतांना आपली पत्नी 'आदर्श' कशी होती हेंहि तो सांगत आहे; व तिचे सस्कार झालेल्या वस्तूंत तिचें हृदयस्पर्शी प्रतिबिंब आपणांस कसें दिसत आहे, हें तो निवेदन करीत आहे !

**कंठबासरी** = गोड गळा व त्यांतून निघणारे आलाप; **अवकळा** = ओंगळ स्वरूप; **हृत्सरीं** = हृदयरूपी सरोवरांत – तुझ्या प्रेमळ भावनेंत; **अज्ञेयतरुची कळी**=त्या थोर अज्ञेय तत्त्वरूपी वृक्षाला आलेली कळी; **स्वर-तरंगावली** = एखाद्या रागदारीनें निर्माण केलेली सुरेल तरंगाची छाया; **शुक्रचांदणी** = शुक्राची चांदणी प्रेमाबद्दल व तेजस्वितेबद्दल प्रसिद्ध आहे; **झंकृति**=शारदेच्या वीणेंतील कोमल स्वरमाला; **प्रतिवस्तुंत**=प्रत्येक वस्तूंत. शेवटच्या कडव्यांतील वास्तवाचे चित्रण करण्याने कवितेच्या परमोत्कर्षाला पूर्णत्व कसें आलें आहे तें पहा.

## ३२. वाऱ्यामार्गं–!

ही कविता 'बकुळा' (क्र. २१) या काव्याप्रमाणेंच एक छोटें कथाकाव्य आहे. पक्ष्यांच्या जीवनांतील एका घटनेचें यांत पांच परिच्छेदांत संपूर्ण चित्र रेखाटलें आहे. ही कथा म्हणजे प्रत्येक संसारी माणसाच्या जीवनांतील नित्याचा एक अनुभव आहे.

**सांदडींत** = अडचणीच्या जागेंत; **प्रभा-माईच्या** = घराची मालकीण व तिची मुलगी यांच्या; **परांची**= पिसांची; **जोगविलं** = खावयास घालून पुष्ट केलें; **कवटींतून**= अंड्यांतुन; **निरवून** =( माझ्यावर ) सोपवून; **वाऱ्यामागं** = वाऱ्याबरोबर पोटाच्या मागे.

पिलें पोटामागे गेल्याने संसारांत येणारा सुखदुःखमिश्रित एकलेपणा यांत व्यक्त झाला आहे !

## ३३. सुखी संसार :

यांत सुखाचा संसार केलेल्या एका व्यक्तीने आपल्या जीवनाचें उत्तर आयुष्यांत सिंहावलोकन केलें आहे. जीवनाच्या आरंभीं मनुष्य त्याकडे ध्येयवादी दृष्टीने पाहतो; पण आपल्या ध्येयांपैकीं बहुतेक ध्येयें हस्तगत झाल्यास पुढे काय ? असा प्रश्न त्याच्यापुढे उभा राहतो. त्यावेळीं आपल्या मुलाबाळांच्या ध्येयांशीं आपण समरस व्हावें, असें तो म्हणतो. असें होत नाहीं, म्हणून तर जीवनांत मतमतांतरें निर्माण होतात.

**भरदार नवतींत** = ऐन तारुण्यांत; **शिणगार** = शृंगार; **उजविलें** = उद्धार केला.

# ३. समाज

## ३४-३५. परित्यक्ता-टाकलेली :

या दोन्ही कवितांतील व्यक्तींच्या भावना परिस्थित्यनुरूप प्रामाणिक आहेत. त्यांच्या त्यांच्या परिस्थितीप्रमाणें त्यांच्या मनोभावना तयार झालेल्या आहेत. म्हणून त्यांची तुलना करून पाहण्यासारखी आहे.

**कणव** = दया; **सान्निधता** = जवळीक; **गाथा** =चरित्र; **प्रणयद्रुम**= प्रीतीरूपी वृक्ष; **जाळ** = पोटांतील दुःख.

## ३६. पाय घसरला तर :

**शिवशाही** = छत्रपती शिवाजी महाराज यांचें राज्य; **धर्मसिंधू**= हिंदूंचा धर्मग्रंथ; **सुखशील** =सुखाला चटावलेला; **रविकिरणीं** = ज्ञानाने.

## ३७. दोन पातकी :

**रसरंगेला** = छानछूक; **शुक्री मोती** = शुक्री मोत्यांचें तेज किंचित् पिवळसर शुभ्र असतें तसें; **आडच जवळी केला** = तिने विहिरींत जीव दिला.

## ३८. बियाणा :

माणसें कृतघ्न होऊं लागलीं म्हणजे कोणत्या थरापर्यंत जातात याचें चित्र या कथेंत आहे.

हबसाणीं = ॲबिसिनीया ( ॲबिसिनीयावर मुसोलिनीने स्वारी केली, त्या वेळची ही कथा आहे ); **हिंडलगें** = कर्नाटकांतील बेळगांव जवळचें एक गांव; येथे एक मोठा तुरुंग आहे व त्यांत राजकीय कैदी ठेवण्याची ब्रिटिशांची पद्धत होती; **गळितें** = गाळून तेल काढण्याचीं धान्यें— उदा० करडी, भुइमूग वगैरे; **येरवडा** = पुण्याजवळील एक गांव, येथेहि एक मोठा तुरुंग असून, त्यांतहि राजकीय कैदी ठेवण्यांत येत असत.

## ३९. यशस्वी कोण ? :

**संसारार्णववीचि** = संसाररूपी समुद्रावरील (संकटरूपी) लाटा; **धर** = आधार; परिस्थितीपुढे नमणारे व परिस्थितीला आपल्यापुढे नमविणारे असे जे दोन वर्ग आहेत, त्यांचींच शंख-शिंपल्या व मोती हीं 'प्रतीकें' आहेत.

## ४०. स्थानभ्रष्ट फुलास :

**स्पर्शाया धजतां ... बाहेरुनी** = रस्त्यात पडलेल्या फुलाला स्पर्श करतांना स्वतांचीं व समाजाचीं नैतिक बंधनें आड येतात, हा म्हणण्याचा भाव; त्याची रसिकता त्याला फूल उचलून घेण्याचा मोह पाडते, तर वरील बंधनें त्याच्या आड येऊन तो दूर सरतो.

## ४१. कृतज्ञता :

**ही कोकणांतून देशावर पुण्यासारख्या शहरांत शिकण्यासाठी आलेल्या, एका गरीब, वार लावून जेवणाऱ्या मुलाची, करुण कहाणी आहे.**

**धर्मात्मा** = ज्याला आपला वैद्यकी व्यवसाय म्हणजे धर्म वाटतो असा एक डॉक्टर.

### ४२. देवी क्षमे :

शिक्षेपेक्षां क्षमेनेच अपराधी सुधारतात हें लक्षांत घेऊन प्रत्यक्ष क्षमा-देवीलाच यांत याचना करण्यांत आली आहे.

**रातले** = रमले; **अनुताप** = पश्चात्ताप; **हृद्वेदीवरती** = त्यांच्या हृदयरूपी स्थंडिलाभोवती; **स्वार्थ न वा परार्थ** = 'ते कोण की दुर्मती' ( ते के न जानीमहे ) या वर्गातले; **दिव्यलोकसमता** = स्वर्गीयता.

## ४. निसर्ग

### ४३. सुंदर हिरवे माळ :

पावसाळ्याच्या पहिल्या सरींनी सपाट विस्तृत माळ एकदा पालवले की किती सुंदर दिसतात, हें पाहण्यासारखें असतें. त्याचेंच चित्रण या कवितेंत केलें आहे.

**माळावरल्या वनराणीला** = या माळावर एका राणीचा महाल आहे अशी कल्पना केली आहे, तिला; **सुढाळ** = तेजस्वी; **जोगवलेलीं** = पुष्ट झालेलीं; **काळ्या छाया** = आकाशाच्या पार्श्वभूमीवर सखल जागेंतून दिसणाऱ्या उंचावरल्या जनावरांच्या वा माणसांच्या छाया ( सिल्हूट्स् )

माळावरल्या या सर्व सौंदर्यात 'शेतकऱ्याच्या पोटांतील जाळ निवला नाही' ही एक उणीव आहे.

### ४४. वारेपाऊस :

या पावसाचें येणें, कोसळणें, निघून जाणें व मागाहून संध्याकाळीं सुंदर सोनेरी चांदणें पडणें, हीं दृश्यें विलक्षण चित्ताकर्षक असतात! उन्हाळ्यामध्ये येणाऱ्या वळीव पावसाच्या वेळीं तीं दिसतात.

**धारासारीं** = पावसाच्या धारांत; **निवतां पंचप्राण** = शेतकऱ्यांचें समाधान या पावसानेंच होतें.

## ४५. भलंरी :

ही कविता म्हणजे शेतकऱ्यांच्या जीवनांतील कुणबाऊ भाषेतील एक काढणीचें गीत होय. शेतकरी लोक जोंधळ्याला (शाळूला) सर्व पिकांचा राजा समजतात. त्यामुळें काढणीच्या वेळीं त्याला विळा किंवा कोयता लावावयाचा नाही, एक जुपीने काम करावयाचें, एकमेकांच्या शेतांत एकमेकांनी विनामूल्य पाळ्या घालून सहकार्य करावयाचें व शेवटीं चांदण्या रात्रीं 'इर्जिकीचें' म्हणजे श्रमभोजनाचें—नळीचें जेवण करावयाचें या त्यांच्या परंपरा आहेत. या परंपरा या गीतांत प्रतिबिंबित झाल्या असून, शेतकऱ्याचें खळ्यावरील समाधानहि त्यांत व्यक्त झालें आहे. शाळूच्या काढणीचें काम या पद्धतीने होत असतें.

या गीताचें वृत्त, चाल, हिसका, धाटणी सर्वतोपरी शेतकरीजीवनांतील असल्याने, काढणीचें खरेंखुरें चित्र आपल्या डोळ्यासमोर उभें रहातें.

**भलंरं** = हा शब्द एकमेकांस प्रोत्साहन देण्याच्या 'भलें' व 'अरे' या शब्दांपासून निर्माण झाला असावा; आणि मग भलंरं म्हणण्याचें गीत म्हणजे भलंरी–काढणीचें गीत–हा अर्थ त्यांत नंतर आला असावा; **सुकीर** = शुक्र; **कापूरवडा** = कापूर हें शेजारच्या ओढ्याचें नांव आहे; **खेळिया** = खेळवणारा गडी; **न्हिरी** = न्यहारी; **जित्राप** = (जितें रोप) उभें पीक; **सौदा** = शेतकरी जोंधळ्याच्या जिवावर वर्षाचे लागणारे मीठ, मिरची, मसाला व कापड हे जिन्नस आणतो, म्हणून त्याचा तो सौदाच असतो; **पाळी** = काम; **काळी** = जमीन; **नळी** = मांसाहारी जेवणांत मिळणारा हाडांच्या पोकळींतील रस; **इरबाळ** = बराच वेळपर्यंत; **डुईचं पानी** = घाम; **खळं** = धान्य मळण्याची वाटोळी जागा; **कनगी** = कणिंग; **गंजी** = कडब्याच्या राशी; **मलिदा** = तिंबलेली कणिक, खुराक, पौष्टिक अन्न.

## ४६. दौल्याची दिवाळी :

**मुंडासें** = कुणब्याचें पागोटें; तण = शेतांतील पिकांत माजलेलें गवत (तृण); **भांगलणें** = शेतांतील पिकाच्या तळचें तण काढून टाकून खुरप्याने

माती भुसभुशीत करणें, निंदणें; **डोंबकहाली** = आग; **हस्ताची माया** = हस्त नक्षत्राचा पाऊस; **गडणी** = मैत्रिणी.

## ४७. धुक्यांत :

आपल्या भोवतीं सर्व दाट शुभ्र धुकें पसरलें आहे व आपल्याला आपल्या खेरीज वर, खाली, भोवती, इकडेतिकडे शुभ्रतेखेरीज काहीच दिसत नाही, हा अनुभव अनन्यसाधारण आहे. खंडाळ्याच्या घाटांत (बोरघाट) पावसाळ्यात हा दुर्मिळ अनुभव येतो. त्यावेळीं क्षणभर काय वाटतें याचें हें शब्दचित्र आहे. **चळा** = पावसाच्या सरी; **नसानसांत** = शिरेशिरेंत, अणुअणूंत.

## ४८. शांतिस्थान :

'शांतिस्थान' हें माझ्या गांवच्या (रहिमतपूर जि. उ. सातारा) 'कमंडलू'-कांठच्या 'गजधरणाजवळील' एका निवांत खडकाळ जागेला मी दिलेलें नांव आहे. तेथें संत्रस्त मनःस्थितींत जाऊन बसलें, कीं मन शांत होतें. या जागेचें हें शब्दचित्र आहे.

**विंझणवारे** = वारा घालणारे वारे; **माझी नगरी** = रहिमतपूर हें गांव; **चंद्रागिरी** = माझ्या गांवाजवळच्या एका टेकडीचें नाव; **अंभेरी** = हें एक शेजारच्या खेड्याचें नांव. (याचा उल्लेख माझ्या 'आंबराई' काव्यांत आहे;) **घुमट** = माझ्या गांवीं विजापूरच्या मुसलमान राजघराण्यांतील स्त्रीपुरुषांचीं काही थडगीं असून, त्यावर भव्य घुमट (मशीदी) बांधले आहेत. **प्रियमित्राच्या गांवा** = कृष्णकाठचें **आरळें** हें गांव व तेथे राहणारा माझा मित्र (कै. शंकर बळवंत कुलकर्णी); **ध्यान ध्यावें** = एकतान मन करावें.

## ४९. स्मृतिस्थळ :

**ऊर्जस्वल** = उदात्त; **प्रेमळ जोड** = सहधर्मिणी व तिचे वडिल मातुःश्री वगैरे; **मोहनसुंदर वाणी** = सहधर्मिणीच्या वडलांची आकर्षक व

**गोडव्यानें** भरलेली प्रेमळ वाणी; **विकळता** = व्यथित भाव; **निशाणी** = जखम, दुःख; **वाढंवि उष्णश्वास** = सुसकारे टाकावयास लावतो, दुःख वाढवितो; **आग** = दुःख.

## ५०. आकाशलिंब :

'आकाशलिंब' म्हणजे 'गरुडलिंब' ऊर्फ 'मिर्नेटोण्याचें झाड' या सुनीतांत आकाशलिंबाचीं फुलें व माझी कविता यांची तुलना करून त्यासंबंधींची हुरहूर व्यक्त केली आहे.

**भावार्थ** = आशय; **आकाशांतून ... वर्षण** = ईश्वरी कृपा; **श्रांतल्या** = दमूनभागून झोपल्या.

## ५१. मानसमेघ :

**शैलाग्रमाला** = पर्वतांच्या टोकांच्या रांगा; **अनंतावधि** = अनंतांत म्हणजे आकाशाच्या अमर्याद पोकळींत घुसणाऱ्या; **उधाणून** = भरती येऊन; **प्रपात** = धबधबा; **महामानसा** = श्रेष्ठ अशा मना, (पक्षीं) मानससरोवरा; **आन्तर : को ऽ पि हेतुः** = अंतःकरणांतील काही एक हेतु, प्रीती ('व्यतिषजति पदार्थानान्तरः कोऽपि हेतुः । न खलु बहिरुपाधीन् प्रीतयः संश्रयन्ते' या श्लोकांतील 'प्रीति' या अर्थी एक वचन.), **उमाळून** = उमाळे येऊन; **यक्षसंदेश** = मेघदूत काव्यांतील यक्षाचें घर इथेच कोठे तरी असावें. यक्षाने आपल्या प्रियेला पाठविलेल्या संदेशांतील गोड गोड भाव (मनोराग) इथे सांडले आहेत काय? **प्रभावी उमेच्या ... वोसंडलें** = उमेने शंकराच्या प्राप्तीसाठी उग्र तप केलें, त्याचें हें तेजच गिरीशापुढें चमकत आहे काय? **दृष्टिची फेक वा ऊर्वशीची ... राहिला** = केशी राक्षसाने ऊर्वशीला पळवून नेलें, तेव्हा पुरुरव्याने तिला सोडवून आणलें; ऊर्वशी मूर्छित झालेली होती व तिचें डोकें आपल्या मांडीवर घेऊन पुरुरवा तिच्या मूर्च्छेवर उपचार करीत होता; इतक्यांत ती शुद्धीवर आली व तिने डोळे उघडले; तों तिला समोर (वरती) पुरूरव्याचा सुंदर चेहरा दिसला! त्यावेळीं तिने जो पहिला

दृष्टिक्षेप केला तोच हा काय, असा भाव; **हंसचित्तें** = परमहंसांचीं मनें, किंवा मानसाकडे जाणाऱ्या हंसांचीं मनें; **सुवर्णांग कंचनी** = सोन्याच्या कांतीसारखें अंग असणाऱ्या नर्तिका; **बोधिसत्व** = बुद्ध; **राजदेवांगना** = राजघराण्यांतील सुंदर **स्त्रिया; अंगारणें** = आग; **ज्वलद्भाव** = जळणारे भाव; **स्फुरद् वैखरी** = स्फुरणारी वाणी; **मूकभाषी** = जी बोलतां येत नाही अशी, आंतले आंत गुदमरणारी; **बोलके चिंतामणी** = कवि (रामदासानीं कवींना 'की हे बोलके चिंतामणी' असें म्हटलें आहे;) **हिंदवी** = भारतीय (हा शब्द प्रथम श्रीशिवछत्रपति शिवाजीमहाराज यांनी 'हिंदवी स्वराज्य' असा उल्लेख करून वापरला; **मानदंडा**=हिमालया, (हें विशेषण कालिदासाने हिमालयाला वापरलें आहे); **अश्रणी** = (अशरीरिणी वाणी) आकाशवाणी.

ही कविता भारत पारतंत्र्यांत असतांना (१९३९) लिहिलेली आहे हें लक्षांत घेणें जरूर आहे.

नैनितालच्या (हिमालय) पर्वतांत 'चायना पीक' हें सात हजार फूट उंचीवर एक ठिकाण असून, त्याच्या टोकांवर उभें राहिले असतां, समोरच्या अर्ध वर्तुळाकार भिंतीवरील पितळी पत्र्यावरील बाणांच्या टोकांच्या अनुरोधाने दृष्टी फेकली, की दूरवर 'मानस, नंदादेवी' वगैरे ठिकाणें दिसतात.

## ५२. क्षणाचाच विलंब :

यांतील कल्पना पुण्याचे श्री. स. रा. गोडबोले यांच्या घरांतील एका सुंदर चित्रावरून सुचलेली आहे.

**जरा कष्टानें** = तिला तशा स्थितींत टाकून कसें जावें या विचाराने जरा कष्टी होऊन; **अंतर्वैरी** = अगदी मरणाच्या वेळीं जवळ असलेला जिवलग दूर जातो, त्याला हें विशेषण लावतात; **आणि अस्ताला सूर्यबिंब जाय** = यांतील रसध्वानि पहा.

# ५. कविता

## ५३. श्रीशारदावंदन :

**आलोकन** = दृष्टिक्षेप; **जड** = अज्ञानी; **दिव्यता** = अलौकिक सामर्थ्य; **मंदाकिनी** = आकाशगंगा; **कल्लोलिनी** = नदी; **कादंबिनीखंड** = मेघांचे तुकडे; **आदिरूप** = मूळ रूप; **खोलुनी** = उघडीं करून; **ओवी...आर्यामुखांनीं** = मुकुंदराज, ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, तुकाराम, रामदास, वामन पंडित, मोरोपंत आदिकरून कवींनी आपापल्या आवडत्या वृत्तातून; **आर्तंगी** = कळवळ्याने निघालेली वाणी; **कांचनाची गंगा** = यांत 'कांचनगंगा' हें पहिल्या काव्यसंग्रहाचें नांव गोवलेलें आहे, सुवर्णगंगा.

## ५४. कवितेचा जन्म :

**अंतर्लोचन** = चित्तचक्षू; **व्यामोहते** = क्षणभर भ्रांत होते; **द्रुतगती**=वेगवान्; **चंड** = प्रखर; **प्रेमांतराकर्षिणी** = प्रेमळ अंतःकरणाचें आकर्षण वाटणारी; **रुद्रता** = भयंकर स्वरूप; **गिरा** = वाणी.

यांत कोमल, तीव्र, नाजुक, भेसुर, असे भाव, गायनी कळा, चित्रकला या सर्वांचा उल्लेख कसा आला आहे तो पहा. काव्य, गायन, शिल्प, चित्र या सर्वच कलांमध्ये कलाकृतीच्या जन्मकाळची अवस्था एकच असते, हा म्हणण्याचा उद्देश.

## ५५. सुनीत :

'सुनीत' हा शब्द मी (गिरीश) व माधव जूलियन यांनी Sonnet या इंग्रजी शब्दावरून तयार केला. सुनीत हें प्रामुख्याने त्यांतील कारागिरीबद्दल प्रसिद्ध असल्यानें, 'सुष्टु नीतम्' असें त्याचें आम्हीं समर्थनहि केलें. सुनीत हा **काव्यप्रकार** आहे व **वृत्तप्रकार**हि आहे व तो पाश्चात्य वाङ्मयांतून आपल्याकडे केशवसुतांनी प्रथम आणला. त्यांत चौदा ओळींत एक भावगर्भ विचार रेखाटलेला असतो. काव्यप्रकार या दृष्टीने सुनीत हें भावगीत किंवा नाट्यगीत आहे. कधी कधी त्यांत पहिल्या बारा ओळींत

एकाच विचाराचें चित्रण केलेलें असतें व शेवटच्या दोन ओळींत त्याचा परमोत्कर्ष किंवा त्याला दिलेली कलाटणी असते. या सुनीनाला **शेक्सपीयर पद्धतीचें सुनीत** म्हणतात. कधी कधी त्याचे आठ व सहा ओळी असे विभाग करून त्यात दोन विरोधी विचार मांडलेले असतात. हें **मिल्टन पद्धतीचें सुनीत** असतें. मनुष्याचें मन जसें एकाच विचारांत गुंतलें जातें व त्याला कुठे तरी कलाटणी मिळते, तसें तें कधी कधी दोन दोन विरोधी विचारांमधे म्हणजे एकाच विषयाच्या दोन बाजूंमध्येहि गुंतलें जातें. या भावगर्भ विचारामुळें सुनीत हें '**काव्यप्रकारांत**' जमा होतें. परंतु भावगर्भ विचाराइतकीच त्याची बांधणी म्हणजे त्याचें शिल्प हें महत्त्वाचें असल्याने, त्यांची गणना **वृत्तप्रकारांतहि** होते.

सुनीतामध्ये ओळींची बांधणी ही फार महत्त्वाची गोष्ट असते. ही त्यांतलि विचार व शेवटच्या शब्दांचे प्रास यांच्या साहाय्याने एकसंध करतां येते. उदाहरणार्थ पहिल्या चार ओळींना अ, ब, क, ड अशीं नांवें दिलीं, तर कधी अक व बड यांचे एकाआड एक असे प्रास साधण्यांत येतात; तर कधी अड व बक यांचे प्रास साधण्यांत येतात. पुढील श्लोकांतहि हीच पद्धति ठेवण्यांत येते. शेक्सपीयर पद्धतींत शेवटच्या दोन ओळी प्रासात्मक येतात. मिल्टन पद्धतींत शेवटच्या सहा ओळींचे प्रास अबक-अबक असे होतात. सुनीताच्या बांधणीची ही स्थूल रूपरेषा आहे. ( यापेक्षां अधिक माहितीसाठी प्रा. श्री. बा. रानडे व श्री. गिरीश यांचे लेख अनुक्रमें '**काव्यविचार**' व '**काव्यकला**' या पुस्तकांत पहा. तशीच डॉ. वि. म. कुलकर्णी व प्रा. मा. ग. बुद्धिसागर यांच्या '**मराठी सुनीत**' या पुस्तकाची प्रस्तावना वाचा. ) उदा०—शेक्सपियरपद्धत–सु०५५; मिल्टनपद्धत–सु.३९; या सुनीतांत सुनीताला ताजमहालची उपमा कां दिली आहे, हें भावना व शिल्प या दृष्टीनें विचार करून पहा.

## ५६. लक्ष्मीपूजनाच्या सायंकाळीं :

आपण कितीहि तापून तापून कार्ये केलीं तरी काळाच्या तडाख्यांतून

त्यांना जावयाचें असतें. काळ काव्याचें परीक्षण करतांना शाश्वत मूल्यें व जीवनांतील भावगर्भ सौंदर्य यांच्या कसोट्यावर तीं घासून पहातो. त्यांत तीं उतरलीं तर टिकतात, नाही तर नाही. मग माणसाने आपल्या काव्याचा गर्व कशासाठी वहावा! हा भाव दिवाळींतील बाणांच्या दृष्टांताने या सुनीतांत व्यक्त केला आहे.

**तमिस्त्र** = अंधार; **कातळ** = खडक ( पुणें फर्ग्युसन कॉलेजजवळील टेकडीवरील एक खडक ); **पुरींत** = पुण्यपुरींत–पुण्यांत; **पेटुन** = तापून.

## ६ व्यक्ती व स्थळें

### ५७. सारंगीवाला :

पुण्यामध्ये एक सारंगीवाला याचक रोज रात्रीं दहाच्या सुमारास रस्त्याने सारंगी वाजवीत जात असे. त्याचे स्वर कानीं पडले की पेठेंतील दारें खिडक्या खडाखड उघडलीं जात व लोक त्याचें वादन ऐकण्यांत तन्मय होत. त्या प्रसंगाला उद्देशून ही कविता लिहिली आहे.

ही जाति एका ठुंबरीपासून मीं बनविली आहे. कै. माधवराव पटवर्धन यांनीं तिचें '**मनमोहन**' असें पहिल्याच शब्दावरून नामकरण केलें. या कवितेच्या जन्मानंतर याच विषयावर व याच जातींत यशवंत, माधव जूलियन, अत्रे, गो. गं. पोतदार वगैरे अनेक कवींनी 'सारंगीवाला' या नांवाच्या कविता लिहल्या.

### ५८. सूरसंगिनी :

२१ जून १९२८ या दिवशीं रात्रीं पुण्यांतील किर्लोस्कर नाट्यमंदिरांत सौ. हिराबाई बडोदेकर यांचें अत्यंत सुंदर गाणें झालें. स्वराला चिकटून गायन करण्यांतील त्यांचें कौशल्य अलौकिक होतें. ही कविता त्यांना उद्देशून लिहिली आहे.

**सूरसंगिनी** = स्वराला चिकटणारी; **स्वरसंगमता** = निरनिराळ्या स्वरांचें मिश्रण; **हृत्कुहरीं** = हृदयरूपी गुहेंत; **स्वप्नसंगि...पहाणारी** = स्वप्नाळू दृष्टीला मग अंधारांतदेखील डोळसपणा येतो.

## ५९. सप्तर्षी :

ही कविता 'रविकिरणमंडळावर' आहे. र. कि. मं. ने आपल्या पुस्तकावर सप्तर्षींचें चित्र घातल्यामुळें वाचक त्याच्या सदस्यांना विनोदाने 'सप्तर्षी' म्हणूं लागले व त्यांत एक स्त्री (कै. सौ. मनोरमा रानडे) असल्याने हें साम्य 'वसिष्ठअरुंधतीपर्यंत' दाखविण्यासाठी ताणण्यांत आलें. या कवितेंत या सप्तर्षींचें स्वरूप व ध्येय यांचें निवेदन आहे.

## ६०. गुरुदेव रवींद्र :

ही कविता डॉ. रवींद्रनाथ टागोर यांच्यावर आहे.

**सोनेरी नौकेंतून** = टागोरांची 'षोणार तरी', सोनेरी नौका या नांवाची एक सुंदर कविता असून, तींत एका शेतकऱ्यानें एका देवदूताकरवीं नदीपलीकडील गांवांतील लोकांस स्वतः पिकविलेलें धान्य कसें पोचविलें व देवदूतानें त्या शेतकऱ्याची कशी अवहेलना केली याचें वर्णन आहे. **कुंचले** = टागोर हे चित्रकार होते. शांतिनिकेतनमधील त्यांच्या 'उदयन' बंगल्यांत हीं चित्रें लावलेलीं आहेत. **गीतांजली** = हा त्यांचा लोकोत्तर काव्यसंग्रह असून त्याला १९१३ मध्ये जगन्मान्य नोबेल पारितोषिक मिळालें. यांत त्यांचीं उत्कट भक्तिगीतें आहेत; **पाहिली जवळुनी** = पुण्यास १९२०–२२ चे सुमारास डॉ. टागोर आले होते. त्यांनीं 'महाराष्ट्र शारदा मंदिरास' भेट दिली, त्या भेटींत त्यांना जवळून पाहिल्याचा हा उल्लेख आहे.

## ६१. गोपाळ कृष्ण गोखले :

उत्तम वक्ते, थोर राजकारणी व श्रेष्ठ देशसेवक हीं गोखल्यांचीं वैशिष्ट्यें होतीं. महात्मा गांधी त्यांना गुरुस्थानीं मानीत.

**हसरें कलेवर** = मृत्यूनंतरहि त्यांचा चेहरा हसराच राहिला होता. **भारतसेवका** = पुण्याची 'भारतसेवक संस्था' ही त्यानी स्थापन केलेली एक नामवंत संस्था आहे.

## ६२. शनवारवाडा :

पुण्यांतील पेशव्यांचा वाडा शनवार पेठेंत आहे. तेथें आता त्याचे फक्त तट व अवशेष आहेत; त्यांना उद्देशून ही कविता आहे.

**मस्त रंगेल** = वीराचाच शृंगार शोभून दिसतो. पहिले बाजीराव तसे पराक्रमी होते. **भाऊ** = सदाशिवराव भाऊ पेशवे; **कुरुक्षेत्र** = पानिपत; **माधवी नीति** = थोरले माधवराव यांची शासनपद्धति–यांच्या कारकीर्दींत मराठ्यांचें वैभव कळसाला पोचलें होतें; **शाहसूनू** = श्री. शिवाजी महाराजांनी स्वताचा ' शाहसूनू '–' शहाजीचा पुत्र '–असा आपल्या राजमुद्रेवर उल्लेख केला आहे; **पद्मकारंजें** = शनवारवाड्याच्या अवशेषांत एक ' कमल कारंजें ' आहे त्यांत; **नशीबा लावणें हात** = परतंत्र भारतांत हे उद्गार निघालेले आहेत.

## ६३. निजलेल्या वसंतास :

माझा मुलगा चि. वसंत ( बालवसंत ) यास उद्देशून ही कविता आहे.

## ६५. मावळ्यांचें गाणें :

या कवितेंत मावळ्यानीं गाइलेलें श्री शिवछत्रपतींचें समग्र कर्तृत्व रेखाटलें आहे. तोरणा किल्ला घेणें, शत्रूंचा निःपात, धर्माची प्रतिष्ठापना, आरमारी योजना, परस्त्रीसंबंधी आदर, मातृभाषेचा उद्धार, भगवा झेंडा ( अध्यात्मदर्शक ) व जरीपटका ( राज्यशासनदर्शक ) यांची प्रतिष्ठा यांमुळें ते मराठ्यांचे खरे राजे म्हणून गाजले. त्यांचें विभूतिमत्व व व्यक्तिमत्व सर्वश्रेष्ठ होतें.

## ६६. माळावरील शिरीष :

१९४२ ची महात्मा गांधींची चळवळ फसली व चळवळ्यांना ब्रिटिश सरकारने भयंकर कडक शिक्षा दिल्या ! यानंतर महात्माजी काही काळ अगदी स्तब्ध राहिले व पुढील अंतःप्रेरणेची वाट पहात राहिले. भारतीय

जनतेन फार हाल सोसले व महात्माजींनी मुग्ध राहून एक प्रकारची तपश्चर्या चालविली.

अशा वेळीं एका ऐन उन्हाळ्यांत 'सांगली विलिंग्डन कॉलेज'च्या आवारांतील एका शिरीष वृक्षाचीं पानें नेहमीप्रमाणें झडून गेलीं व त्याच्या खराटे झालेल्या फांद्यांला त्याच्या वाळलेल्या शेंगा फासावर लटकलेल्या माणसांसारख्या लोंबत व वाऱ्याने खुळखुळत राहिल्या! पण पंधराच दिवसांत या शिरीषाला पालवी फुटली, नाजुक फुलें आलीं व त्याचें सुंदर वैभव एकाद्या स्वतंत्र. स्वयंस्फूर्त व तेजस्वी राष्ट्रासारखें खुलून दिसूं लागलें! या दोन कल्पनांच्या मीलनांतून या कवितेचा जन्म झाला आहे.

**पंचाग्नीसाधन** = चारी बाजूला अग्नि पेटवून व डोक्यावर सूर्याचें ऊन सोसून जी तपश्चर्या केली जाते, तिला हें नांव देण्यांत येतें; **परागांचीं फुलें** = शिरीष पुष्पाला पाकळ्या नसतात; तें नुसतें मऊ, नाजुक व रंगीत अशा परागांचेंच फूल असतें; **सूर वितळवूनी ... सुगंधांतून** = नवीन वाऱ्याने (नवीन ध्येयाने) स्वरांचे सुगंध बनविले; **पुरंध्री** = अभिजात-वृत्तीच्या प्रौढ स्त्रिया; (हीं फुलें ज्यांनीं डोक्यावर धारण केलीं त्यांची माथीं भडकलीं व ज्यांनीं हृदयावर धारण केलीं त्यांचा हृदयपालट झाला असा म्हणण्यांतील भाव–१९४२ च्या चळवळींत हे सर्व चमत्कार घडले); **वाममार्गांनीं संपदेची लूट**=काळ्या बाजारांतील पैसा; **भगीरथापरी**= भगीरथाने गंगा आणून आपल्याच कुळांतील सगरपुत्रांना मोक्ष मिळवून दिला, त्याप्रमाणें; **कुंडलिनी** = शरीरांतील मणिपूर चक्राचे ठिकाणीं सर्पाच्या आकृतीरूपाने राहणारी प्राणरूप शक्ति. ही योगशास्त्रांतील एक शक्ति समजली जाते. योग्याला ही समाधीस्थितींत अमृत देऊन जिवविते, अशी कल्पना आहे; **शांतीजीवनार्थ ... दाहक** = शांतीमधील दाहकता विलक्षण असते. शांतीचें सामर्थ्य अतुल्य असतें!

निसर्गांतील शिरीषवृक्षाची प्रेरणा, महात्माजींचें तत्कालीन जीवन व त्यांतील शाश्वत तत्वें यांतील अभेद हीच या कवितेची बैठक आहे.

## ६७. निवांत :

प्रियमित्र कै. माधवराव पटवर्धन यांच्या पुण्यांतील '**निवांत**' बंगल्यामध्यें गेलों कीं मागील सहवासाच्या सर्व आठवणी होतात ! त्यांचेंच प्रतिबिंब या सुनीतांत आहे.

**घरवात** = संसार-सांजवात; **घोरांदरें** = वादविवादांचीं तुंबळ रणें; **प्रसंग समरीं** = कै. माधवरावांच्या जीवनांतील घोर समरप्रसंग; **रक्ताळलेलें जिणें** = ज्या जीवनांत अंगाचे वाभाडे निघाले; **त्वत्कीर्तिचीं मंगलें** = तुझ्या कर्तृत्वामुळें तुला जी कीर्ति मिळाली तीमधील अलौकिकता; **जाकळे** = पोळणें, कळवळणें.

## ६८. दीपिका :

ही कविता माझी पत्नी सौ. उमा (सौ. माई) हीस उद्देशून आहे. एकाकाळीं वैभवांत असलेलें आमचें सर्व कुटुंब संकटांनीं उध्वस्त झालें ! पण नेमकी याच वेळीं ती आमच्या घरांत आली व तिने आपल्या शांत, सात्विक व अबोल कर्तृत्वाने आमचें घर सावरलें ! तिने माझें व माझ्या कुटुंबियांचें जीवन उजळलें !

**देहली** = प्रवेशद्वार, देवडी; **अंगप्रत्यंग** = जड व सूक्ष्म शरीर; **गजबज** = अस्वस्थता; **अंतराळीं** = अंतःकरणांत; **अंतराळी** = अधांतरी; **अष्टसात्विकांचा** = अंतःकरणांतील आठसात्विक भावांचा; **सौंदर्याची ज्योत**=जीवनांत व जगांत जें जें सुंदर आहे त्याचें दर्शन घडव, असा भाव.

## ६९. मनीषा :

माझी साठी उलटतांना भावी जीवनासंबंधी मला जें काही वाटलें, त्याची स्वप्नाळू रूपरेषा या कवितेंत रेखाटण्यांत आली आहे.

**कस मार्तीतिल...आकाशांतील** = 'पृथ्वी, आप, तेज, वायु, व आकाश' या पंचमहाभूतांतून मी काय घ्यावें, हें यांत सांगितलें आहे; **संस्कृतिसाठी** = मिळविलेली साठ वर्षांतील संस्कृती; **भूगत** = गुप्त;

**तर्पणें** = दानें; **पराविया** = दुसऱ्याच्या; **विरमावें** = जीवन संपवावें; विशेषरीतीनें एकरूप व्हावें.

# ७ अंतर्जीवन

## ७०. मुरली :

मुरली ही मराठींत भक्तीचें एक श्रेष्ठ प्रतीक झालेली आहे. याच भक्तीचा अविष्कार या भावगीतांत आहे.

**स्वरपीयूष** = स्वररूपी अमृत; **बंधुरा** = सुंदरा.

## ७१. मूक संगीत :

**रवकारी** = आवाज करणारे; **थाट** = स्वरांचे मेळ; **मुग्धगीत** = मूक गाणें.

## ७२. अभंग :

**आपैसें** = सहज; **पाभरीं**= पेरण्याच्या यंत्रांत; **चोजविलीं** = खावयास घातलीं, अनुभवावयास दिलीं; **सत्वरस** = सात्विकतेच्या रसायनानें; **विपुळलें** = संपन्न झालें; **कळा** = वेदना; **वारा प्याला** = बेभान झाला; **पांखरीं** = पंखाखालीं.

हे अभंग म्हणजे वेळोवेळीं काही दुर्दम्य प्रसंगांनी अंतःसागरावर उठविलेल्या लाटा आहेत !

# ‘कांचनमेघां’तील छंदोरचना

या काव्यसंग्रहांतील रचना वृत्त, जाति, छंद, गज्जल व मुक्तछंद या विविध छंदप्रकारांत झालेली आहे. त्यांचें स्थूल स्वरूप असें—

| क्र. | नांव | अक्षरें | मात्रा | गण | उदाहरण |
|---|---|---|---|---|---|
| १ | वृत्त (गणवृत्त) | नियमित | नियमित | नियमित | २८ पितृस्मृति पा. ४३ |
| २ | गज्जल (गणवृत्त) | नियमित | नियमित | नियमित | १७ पूजास्थान पा. २० |
| ३ | जाति (मात्रावृत्त) | अनियमित | नियमित | नाहीत | १ गाणाऱ्या मोहिनीस पा. १ |
| ४ | छंद (अक्षरवृत्त) | नियमित | नाहीत | नाहीत | २७ आईचा आशीर्वाद पा. ४० |
| ५ | मुक्तछंद | नियमित किंवा अनियमित | नाहीत | नाहीत | ६६ माळावरील शिरीष, (अक्षरें ५ व ६) पा. ११३ |

काही गज्जलांमध्ये एका गुरू ऐवजीं दोन लघु चालतात; पण असे गज्जल फार थोडे (उदा. क्षण भेटलों क्र. पा. २ पहा.). फार्शींतील गज्जल हे मराठींतील वृत्ताप्रमाणेंच शास्त्रानें नियमबद्ध केलेले आहेत. मराठी वृत्तें व गज्जल यांत फरक एवढाच की मराठी वृत्ताचा गण **तीन अक्षरांचा** असतो व गज्जलांतील गण **चार अक्षरांचा** असतो. उदाहरणार्थ—

मराठी वृत्त—‘केव्हा येशिल तू म्हणून बघतों मी वाट रात्रंदिनीं’ (शा. वि.)

गणाक्षरें :— केव्हा ये । शिल तू । म्हणून । बघतों । मी वाट । रात्रंदि । नीं

लघुगुरु :— – – – । ⏑ ⏑ – । ⏑ ⏑ । ⏑ ⏑ – । – – ⏑ । – – ⏑ । –

ग ण :— म । स । ज । स । त । त । गा

ग ज ल :— ‘तू एक जिवा शांति दिली प्रेमळ भावें’

गणाक्षरें :— तू एक जि । वा शांति दि । ली प्रेमळ । भावें

लघुगुरु :— – – ⏑ ⏑ । – – ⏑ ⏑ । – – ⏑ ⏑ । – –

ग ण :— '– – ⏑ ⏑' या गणाच्या पुनरुक्तीनें हा गज्जल सिद्ध झाला आहे. फार्शीत यतिभंग मानीत नाहीत, तसेंच गणाला नांवेंहि नाहीत.

वृत्त किंवा जाति यांमध्ये लघु अक्षरांची एक मात्रा व तिची खूण ⏑ ही, आणि गुरु अक्षराच्या दोन मात्रा व त्यांची खूण – ही असते. (उदा. 'येशिल' याच्या मात्रा '– ⏑ ⏑' या होत.)

छंदांत प्रसंगोपात्त ऱ्हस्वाचे दीर्घ वा दीर्घाचे ऱ्हस्व उच्चार करण्यास परवानगी असते. (उदा. '**सुंदर** तें ध्या**न**' यांत 'र' व 'न' दीर्घ आहेत) क्वचित् प्रसंगीं तीन मात्राइतकादेखील प्रदीर्घ वेळ देण्याची पद्धत आहे. (उदा. 'वेलीमध्ये वे ऽ ल कोमल'—मायदेव.)

मराठी वृत्तशास्त्राने एकूण आठ गण मानले आहेत व त्याचें सूत्र डॉ. माधवराव पटवर्धन यांनीं '**यमाताराजभानसलगम्**' असें स्वतः रचून तयार केलें आहे. त्यांत प्रत्येक गणाचें म्हणजे **य म त र ज भ न स** यांचें नांव आणलें असून शिवाय लघूचा **ल** व गुरूचा **ग** हि आणला आहे. या सूत्रावरून कोणत्याहि गणाच्या नांवाच्या अक्षरापासून तीन अक्षरें उच्चारलीं, की त्या गणाच्या मात्रा मिळतात व त्याच लघुगुरु कळतात. उदाहरणार्थ—**य** गण म्हणजे **यमाता** (⏑ – –), **म** गण म्हणजे **मातारा** (– – –). किंवा **स** गण म्हणजे **सलगम्** (⏑ ⏑ –). याप्रमाणें आठांहि गणांचीं लक्षणें कळतात.

मुक्तछंदांत ओळीला लांबीचें बंधन नाही. जेवढा भावगर्भ विचार तेवढी ओळ. यामध्ये क्वचित् पांच व सहा अक्षरांचे शब्द पुनरुक्त होऊन येतात. परंतु छंदाच्या सर्व नियमांपासून त्यांची मुक्तता हेंच त्याचें खरें लक्षण होय. ('**माळावरील शिरीष**' या मुक्तछंदांत पांच व सहा अक्षरांचें बंधन आहे.)

अधिक माहितीसाठी डॉ. माधवराव पटवर्धनकृत '**पद्यप्रकाश**' पहा.

# पहिल्या ओळींची सूची


| | पान |
|---|---|
| अपहाराला हळुच एकदा | ६६ |
| आलों पुण्यपुरीहुनी बहुदिसां | ४३ |
| एकच शांतिस्थान मला तू | ८४ |
| कणकण मऊ माती | ४८ |
| कशी देई कान पहा | १९ |
| कांटे कुटे रानीं | १२४ |
| किति करूं आळवणी | १२९ |
| किति करूं विनवणी | ५३ |
| किति मानसीं मी | १३१ |
| किति दिन लागे ध्यास | ११ |
| किति पाहूं वाट तुझी | १५ |
| किती होती कंटांत | ३६ |
| कुणाचा मी कोण | १२७ |
| केव्हा येशिल तू | ८ |
| कोण उभा हा शाळुमधे | ८१ |
| कोण तू कुठोनि येसि | २५ |
| कोय लावियेली | १२६ |
| खेळ चाले भोवताली | १२ |
| गतिमान नदासम मी व्हावें | १२० |
| गळ्यांत कर टाकुनी | १०८ |
| गेलें तुझ्यावर जडून | २३ |
| गोळा केलीं बीजें | १२५ |
| घुमति तुझे स्वर मंजुळ | ३९ |
| चल निशाण धर हें करीं | ११० |
| चला रायगडा | १११ |
| छाया तरूंच्या किती | ९४ |
| जाताना चरणांवरी शिर | ४४ |
| जातां श्रावण वर्षुनी | ८९ |
| जीव तुझ्यास्तव शिणला | ३४ |
| जीवाची रमणीयता हरपली | ९६ |
| टेविलें पाऊल दारीं | २१ |
| तव भास अंतरा झाला | १३ |
| तव मूर्ति बघूं मी कुठे | ४६ |
| तशीच होती सुंदर त्याची | ६४ |
| तुज फुलांफुलांतुन सुगंध | १०३ |
| तुझी माझी जन्माचीच जोडी | ५१ |
| तुझि मुरली मधुर | १२२ |
| तुझ्या विच्छिन्न रूपाला | १०६ |
| तुझी शुभ्र उत्तुंग | ९० |
| तू एक जिवा शांति दिली | ३१ |
| तू येणार म्हणून | ७ |
| तेव्हा क्षुब्ध दिशांमधून | ४५ |
| दृश्यें सुंदर हीं | ९५ |
| दान केलें एकदाचें | ४ |

| | पान |
|---|---|
| धीरोदात्त तुझा अर्जुन | १०५ |
| नजरेंतली तव मोहिनी | २ |
| निखारे फुलले | ११३ |
| प्रीति खरी मजवर | ५ |
| प्रेम केलें काय झाला हा गुन्हा | २० |
| पोर खाटेवर मृत्युच्याच दारां | ७१ |
| भलंरं ! भलंरं ! | ७९ |
| भेटीने विरसे कसें मन | ९ |
| मज चैन नसे ग | १७ |
| मधुर विमल हृदयीं | १४ |
| मनमोहन वाजवुनी सारंगी | ९८ |
| माफी मजला करा | ५५ |
| मुग्धता माझी तुझ्या का | ३ |
| येथे आपण बैसुनी | ११७ |
| येथेच गाइली असती | ८७ |
| ये मंगलमय विमलते | ३२ |
| ये हळू जपूनच ताई | ५७ |

| | पान |
|---|---|
| रानें डोंगर भोंवती हिरवळी | ८३ |
| राहे एक तमिस्र | ९७ |
| लावि जिवा वेड तुझी | १०० |
| वारेपाऊसगान गाउं या | ७६ |
| शिरीं धोंडा लागुन जखम | ९३ |
| शुक्राची नव हेमकांति | १०२ |
| शुभमंगल मंगल | ४० |
| संध्या तांबुस रंगली | ७० |
| संसारतापाने जीव जधी | १२८ |
| संसारार्णववीचि घोर उठल्या | ६९ |
| सुंदर हिरवे माळ | ७४ |
| सूर नको शब्द नको | १२३ |
| सोड सोड आता अपुल्या | १ |
| स्नेहल, स्नेहल दीपिका | ११८ |
| स्वार्थी ठेवुनि घोर दृष्टि | ७३ |
| हिरवी झाडी मुळामुटेच्या | २८ |
| होती सांज, दुरून | १० |